


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका



संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३०, अंक ११८ — जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९५६

## या अंकांत



◆ ◆ ◆

संपादकीय
पत्रव्यवहाराचा
पत्ता :

१२६ डी. फणसवाडी,
मुंबई

◆ ◆ ◆

महाराष्ट्र साहित्य परिषद्,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.

● ● ●

● ● ●

# केशवसुत
# कला आणि काव्य

● ● ●

संपादक—वि. स. खांडेकर

चार रंगी मुखपृष्ठ

किंमतः —दोन रुपये आठ आणे

प्रकाशक :—देशमुख आणि कंपनी

२२ कसबा,—पुणें २.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३०, अंक ११८ जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९५६

# संपादकीय

## माननीयांचा सन्मान

मध्यप्रदेशांतील सुप्रसिद्ध संशोधक व विद्वान प्राचार्य वासुदेव विष्णु ऊर्फ नानासाहेब मिराशी यांच्या विद्वत्तेचा व संशोधन-कार्याचा जाहीर गौरव मध्यप्रदेश शासन साहित्य परिषदेच्या विद्यमानें व राष्ट्रपति राजेन्द्रप्रसाद यांच्या हस्तें नागपूर येथे ता. १६ सप्टेंबर रोजीं करण्यांत आला. या प्रसंगीं त्यांना संस्कृत, हिंदी आणि मराठी या तीन भाषांत प्रशस्तिरूप ताम्रपट आदरपूर्वक अर्पण करण्यांत आले. याशिवाय पांचशे रुपयांचें काश्मीरी महावस्त्र, सुवर्णमुद्रा वगैरेहि देण्यांत आलीं. या गौरवाबद्दल व पुरस्काराबद्दल मी प्राचार्य नानासाहेब मिराशी यांचें हार्दिक अभिनंदन करतों.

मध्यप्रदेश शासन साहित्य परिषदेची स्थापना इ. स. १९५४ सालीं झाली. मध्यप्रदेशांतील हिंदी व मराठी साहित्याला पुरस्कार देऊन त्या त्या भाषांतील साहित्य-निर्मितीला प्रोत्साहन देणें व त्या त्या भाषांतील प्रथितयश विद्वानांचीं व्याख्यानें वेळोवेळीं घडवून आणून त्यांच्या विद्वत्तेचा सक्रिय गौरव करणें या उद्देशाने ही परिषद् स्थापन करण्यांत आली. चालू वर्षी के. बा. सी. मर्ढेकर ( सौंदर्य आणि साहित्य : टीका ), डॉ. वि. भि. कोलते ( मूर्ति-प्रकाश : जुन्या अप्रकाशित हस्तलिखितांचें संपादन ), प्रा. सुरेश डोळके ( रुक्मिणी-स्वयंवर : संपादन ), भा. अ. पांडरीपांडे ( हिरवा चारा : मुलांकरितां पद्य-संग्रह ), श्री. गो. रा. दोडके ( माहेरवाशीण : लघुनिबंध-संग्रह ) व श्री. ब. ग. खापर्डे ( काव्यकांतार : प्रदीर्घ काव्य ) यांना पुरस्कार देण्यांत आला. या सर्वांचे मी अभिनंदन

अनुक्रमणिका







करतों. शासन परिषदेच्या चालकांचेंहि या भरघोस कार्याबद्दल कृतज्ञतापूर्वक अभिनंदन करणें आवश्यक आहे. यापुढे शासन परिषदेचें मराठी भाषेसंबंधींचें कार्य नव्या मुंबई राज्यांतहि सुरू राहील अशी अपेक्षा मी येथे केल्यास ती अस्थानी होणार नाही.

प्राचार्य मिराशी यांना ताम्रशासन देऊन त्यांचा राष्ट्रपतींच्या हस्तें झालेला सन्मान ही मराठी लेखकांच्या दृष्टीने घडलेली एक संस्मरणीय अशीच घटना होय. संस्कृत वाङ्मय व त्याचा इतिहास यासंबंधींचा नानासाहेबांचा गाढ व्यासंग व भारताच्या प्राचीन इतिहासासंबंधींचें त्यांचें दीर्घकालीन सूक्ष्म संशोधन भारतांतील व भारताबाहेरीलहि विद्वानांच्या सुपरिचयाचेंच आहे. गतवर्षी भारत शासनाच्या पुरातत्त्व विभागाकडून 'भारतीय उत्कीर्ण लेखसंग्रह' या ग्रंथावलींत 'कलचुरि-चेदि संवतासंबंधीं उत्कीर्ण लेख' हा ग्रंथ प्रकाशित करण्यांत आला आहे. प्राचार्य मिराशी यांनी त्या ग्रंथाला विस्तृत प्रस्तावना, मूळपाठासंबंधी निर्णय व इंग्रजी अनुवाद जोडून त्याचें उत्कृष्ट संपादन करण्यांत आपली व्यासंगपूर्ण विद्वत्ता व मार्मिकता प्रकट केलीं आहेत. म. म. मिराशी यांची विद्वत्ता महाराष्ट्रालाच नव्हे तर अखिल भारताला भूषणभूत आहे यांत शंका नाही.

● ● ●

फ्लॉरेन्स येथें ता. २५ ते २९ सप्टेंबर या मुदतींत भरणाऱ्या तिसऱ्या जागतिक दफ्तर परिषदेला मुंबई सरकारचे अधिकृत प्रतिनिधि म्हणून उपस्थित राहण्यासाठी म. म. प्रा. दत्तोपंत पोतदार हे विमानाने रविवार ता. २३ सप्टेंबर रोजीं रवाना झाले. गेलीं दोन वर्षे या परिषदेला मुंबई सरकारचे एक अधिकारीच पदसिद्ध प्रतिनिधि म्हणून जात आले आहेत. या वर्षी सरकारी नोकर नसलेल्या पण सर्वथैव योग्य अशा विद्वान् तज्ज्ञाला प्रतिनिधि म्हणून पाठविण्यांत येत आहे हें विशेष होय. ही समयज्ञता प्रकट केल्याबद्दल मुंबई सरकार निःसंशय अभिनन्दनास पात्र आहे.

गेलीं कित्येक वर्षे प्रा. पोतदारांचा साहित्य परिषदेशीं अगदी जिव्हाळ्याचा संबंध आहे. साहित्य परिषदेच्या इतिहासाचे लेखक, साहित्य संमेलनाचे अध्यक्ष, 'पत्रिके'चे संपादक, साहित्य परिषदेच्या घटनेचे प्रणेते व तज्ज्ञ, मराठी वाङ्मयाच्या इतिहासयोजनेच्या संबंधांत नेमलेल्या निर्वाहक मंडळाचे सभासद वगैरे विविध नात्यांनी म. सा. परिषदेची त्यांनी महत्त्वाची सेवा केली आहे. व अद्यापिहि ते करीत आहेत. महाराष्ट्रांतील अनेक सामाजिक, शैक्षणिक व सांस्कृतिक चळवळी व संस्था यांच्याशींहि त्यांचा अध्यक्ष वा उपाध्यक्ष या नात्याने अगदी घनिष्ठ संबंध आहे. इतिहास–संशोधक मंडळाचे तर ते एक नामवंत आधार-स्तंभच आहेत. महाराष्ट्रांतील उत्कृष्ट वक्त्यांत त्यांची गणना होते. त्यांचें वक्तृत्व जितकें ऊर्जस्वल अगर ओजस्वी तितकेंच तें खेळकरहि असतें. त्यांचें व्यक्तित्वहि त्यांच्या वक्तृत्वाप्रमाणेंच आहे. फ्लॉरेन्सच्या प्रवासाच्या निमित्ताने ते रोम, पॅरिस व लंडन या शहरांना भेटी देणार असून तेथील ऐतिहासिक महत्त्वाच्या कागद–पत्रांचीहि ते तपासणी अगर पहाणी करणार आहेत. प्रा. पोतदारांना परदेश–पर्यटनाची ही उशिराने का होईना संधि मिळाली व त्यांनी ती स्वीकारली याबद्दल मी त्यांचें हार्दिक अभिनन्दन करून, त्यांना त्यांच्या कार्यात सुयश चिंतितों.

● ● ●

या वर्षीं साहित्य अकादमीने चौदा भाषांतील कांही उत्कृष्ट ग्रंथांना प्रत्येकीं रु. ५००० रोखीचीं बक्षिसें दिल्याचें जाहीर केलें आहे. कै. बा. सी. मर्ढेकर यांच्या ' सौन्दर्य आणि साहित्य ' या टीकाशास्त्र–विषयक लेखांच्या संग्रहाला रु. ५००० व म. म. पां. वा. काणे यांच्या धर्मशास्त्राच्या इतिहासाला रु. ५००० अशीं बक्षिसें दिलीं गेलीं हें उचितच झालें. श्री. मर्ढेकर बक्षिस मिळालेलें पहावयास जगले नाहींत हें दुर्दैव होय ! पण म. म. काणे यांचा व्यासंग व त्यांची आंतरराष्ट्रीय विद्वत्ता यांचें बक्षिसांच्या या निर्णयाने अल्प कां होईना पण चीज झालें यांत शंका नाही. या गौरवाबद्दल डॉ. काणे यांचें मी हार्दिक अभिनन्दन करतों.

अशा प्रकारचीं रोख बक्षिसें देऊन साहित्य–निर्मितीस प्रोत्साहन देण्याची प्रथा ही स्तुत्य असली तरी एकच एक पुस्तक निवडून त्याला रु. ५००० चें एकच बक्षिस देण्यापेक्षा प्रत्येक भाषेंतील तीन उत्कृष्ट पुस्तकें निवडून त्यांना प्रत्येकीं रु.३०००चीं अगर अधिक रकमेचींहि तीन बक्षिसें देणें हें अधिक स्वागतार्ह होय, हें या निमित्ताने येथे स्पष्ट करणें इष्ट वाटतें. असें करण्याने अधिक लेखक व अधिक पुस्तकें यांना योग्य न्याय मिळूं शकेल. ठेकेदारी अगर वतनदारी निर्माण न करतां उत्कृष्ट साहित्य-निर्मितीस प्रोत्साहन देणें हाच जर साहित्य अकादमीचा अशीं बक्षिसें देण्यांत प्रामाणिक हेतु असेल, तर अकादमीने ह्या सूचनेचा यापुढे जरूर विचार करावा.

## कै. का. रा. पालवणकर

मुंबईच्या ' खेळगडी ' या मुलांच्या मासिकाचे संपादक श्री. का. रा. पालवणकर, हे वयाच्या साठाव्या वर्षी कॅन्सरच्या विकाराने ता. ९ सप्टेंबर १९५६ रोजीं कालवश झाले ! गेलीं दोन वर्षे ते अंथरुणाला खिळूनच होते. इ. स. १९२७ सालीं त्यांनी ' सचित्र खेळगडी ' हें मासिक मुलांसाठी सुरू केलें व इ. स. १९४७ पर्यंत त्यांनी तें स्वतंत्रपणें चालविलें. बी. दत्ताराम आणि कंपनी या जाहिरातीच्या संस्थेचे ते एक प्रमुख भागीदार होते. प्राथमिक शिक्षक म्हणून त्यांनी जीवनाला सुरवात केली. पण वृत्तपत्रलेखनाच्या हौशीमुळे ' लोकमित्र ', ' मनोरंजन ', ' मौज ' या नियतकालिकांच्या कचेरींत ते नोकर म्हणूनहि कांही काळ राहिले होते. मुलांसाठी त्यांनी कांहीं छोटीं छोटीं पुस्तकेंहि लिहिलीं आहेत. दुसऱ्या ' कुमार साहित्य-संमेलना 'चे ते अध्यक्षहि होते. जाहिरात कंपनीचे एक भागीदार या नात्याने त्यांनी कित्येक वाङ्मयीन नियतकालिकांना जाहिराती पुरवून त्यांचा संसार कांही काल तरी तरता ठेवण्यास अप्रत्यक्षपणें मदत केल्याचीं उदाहरणें मला माहीत आहेत. कोणतेंहि काम अंगावर घेतलें की तें मनापासून व हौसेने ते करीत असत. ' खेळगडी 'चे कित्येक अंक त्यांनी आकर्षक पद्धतीने काढलेले आहेत. ' खेळगडी 'चे सर्व हक्क सुप्रसिद्ध प्रकाशक मे. के. भि. ढवळे यांनी विकत घेऊन कांही वर्षे त्यांनी ' खेळगडी ' मासिक आपल्या नेहमींच्या हौशीने नि आकर्षक पद्धतीने चालविलें होतें. तूर्त तरी त्याचें प्रकाशन स्थगित ठेवण्यांत आलेलें आहे. कै. पालवणकर यांच्या दुःखद निधनाचा विचार करीत असता ' खेळगडी ' हें त्यांनी सुरू केलेलें मुलांचें मासिक बन्द राहूं नये असा एक विचार मनांत प्रामुख्याने येतो. विशेषतः श्री. ढवळे यांनी शेवटीं शेवटीं ज्या आकर्षक नि उपयुक्त पद्धतीने ' खेळगडी 'चे अंक प्रसिद्ध केले तिचा विचार करतां, त्यांनी ' खेळगडी 'चें प्रकाशन पुन्हां अवश्य सुरू करावें असेंच कोणीहि सहृदय वाचक म्हणेल.

## आगरकर-टिळकांचें वाङ्मयदर्शन

गेल्या जुलै महिन्यांत आगरकर व लोकमान्य टिळक यांचे जन्मशताब्दी-उत्सव सर्वत्र साजरे झाले. विशेषतः लोकमान्य टिळकांचा जन्मशताब्दी-उत्सव हा भारत सरकारनेच पुरस्कृत केलेला असल्यामुळे, तो सबंध भारतांत मोठ्या प्रमाणावर साजरा व्हावा हें साहजिकच होय. आगरकर व टिळक यांच्या राजकीय, सामाजिक व वाङ्मयीन कर्तृत्वाची ओळख निरनिराळ्या व्याख्यानांतून, लेखांतून व पुस्तकांतून जन्मशताब्दीच्या निमित्ताने आजच्या पिढीला होऊं शकली, हा एक असल्या जाहीर उत्सवांचा अत्यन्त महत्त्वाचा उपयोग म्हटला पाहिजे. पण ही ओळख नेहमी वरवरची होत असते. ती पक्की व्हावयाची असेल तर त्यांच्या-बद्दल इतरांनी काय लिहिलें हेंच केवळ वाचून चालणार नाही. तर त्यांनीच स्वतः लिहिलेले विविध लेख वाचून व ज्या परिस्थितींत व ज्या संदर्भात त्यांनी ते लिहिले हें जाणून घेऊनच त्यांच्या व्यक्तित्वाचा व कर्तृत्वाचा परिचय करून घेतला पाहिजे. विशेषतः आजच्या तरुण विद्यार्थ्यांना त्यांचें वाङ्मय योग्य त्या संपादकीय परिष्करणानन्तर उपलब्ध झालें तर आपल्या देशाचें भवितव्य घडविण्यास ज्यांनी हातभार लावला त्यांच्या थोर कार्याचें व विचारांचें महत्त्व त्यांना पडताळून पहातां येईल. जन्मशताब्दीच्या या निमित्ताने लोकमान्यांवर इंग्रजी, मराठी वगैरे भाषांत अनेक ग्रंथ निर्माण झालेले आहेत. या सर्वच ग्रंथांचें कमी अधिक प्रमाणांत महत्त्व आहे यांत शंका नाही. टिळकांच्या कार्यासंबंधाने विविध लेखकांचे विविध दृष्टिकोण काय आहेत हें कळूं शकतें हा काय थोडा फायदा आहे ? पण त्याचबरोबर विद्यार्थ्यांना त्यांचे विचार खुद्द त्यांच्याच वाङ्मयांतून वाचावयास मिळाले तर त्यांचा परिणाम निःसंशय खोल होऊं शकेल. या दृष्टीने आगरकर अगर टिळक यांच्या वाङ्मयाचें संपादन होऊन त्यांच्या लेखांचीं पुस्तकें प्रसिद्ध होऊं शकलीं तर त्यांचा विद्यार्थ्यांना उपयोग विशेष आहे. अशाच प्रकारचें आगरकरांच्या लेखांचा संग्रह केलेलें एक पुस्तक मॉडर्न बुक डेपो प्रकाशन या संस्थेने नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे. पण अशा रीतीने नुसते त्यांचे लेख एकत्र करून त्यांच्या विचारांचें यथार्थ दर्शन घडेल असें वाटत नाही. ते लेख केव्हां, कोणत्या परिस्थितींत, कोणत्या संदर्भात लिहिले वगैरे संबंधीची भूमिका स्पष्ट करणारा परिचय जर प्रत्येक लेखाला लिहिण्यांत आला तरच त्या लेखांतील मर्म व महत्त्व वाचकांच्या ध्यानांत येऊं शकेल. हें कार्य केवळ प्रस्तावनेच्या साहाय्याने होणार नाही, हें शिवराम परांजपे यांच्या काळांतील निवडक निबंधांच्या संग्रहांना लिहिलेल्या प्रस्तावनांनी यापूर्वीच सिद्ध केलें आहे. प्रस्तावनाकार व संपादक यांच्या भूमिकाच अगदी भिन्न आहेत. लेख एकत्रित करतांना लेखाचा संदर्भ, त्याची सामाजिक अगर राजकीय पार्श्वभूमि, तो लिहिण्याच्या मागील हेतु वगैरे सर्व माहिती संपादकानेच परिश्रमपूर्वक गोळा करून लेखाला जोडली पाहिजे. या माहितीच्या अभावीं लेखांचें सर्वांगीण महत्त्व आजच्या वाचकाला स्पष्टपणें होणें कठीण आहे. आणि प्रस्तावनेंत फक्त लेखकाच्या मोघम वाङ्मयीन गुणाचीच सर्वसाधारणपणाने चर्चा करण्यांत आलेली असते. प्रस्तावना म्हणजे लेखकाच्या लेखन-वैशिष्ट्याची केवळ तोंडओळखच असते. अर्थात्, संपादकाला दोन्ही भूमिका यशस्वी रीतीने करतां आल्या तर तें अधिकच चांगलें. अशा भूमिकांनी युक्त असे जर आगरकर आणि टिळक यांच्या निवडक लेखांचे कांही संग्रह प्रसिद्ध झाले तरच त्या थोर महात्म्यांचा खरा गौरव केल्यासारखें होणार आहे. त्यांचें प्रभावी स्मारकहि याच मार्गाने होऊं शकेल. ● ● ●

वा. रा. ढवळे

महामहोपाध्याय वा. वि. मिराशी

# पंढरपूरचा शिलालेख

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या एप्रील-जून १९५६ च्या अंकांत डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी पंढरपुरास सापडलेला एक महत्त्वाचा शिलालेख ठशासह प्रकाशित केला आहे.[१] हा लेख बराच खराब झाला आहे. त्यामुळे त्याचें वाचन निःसंदिग्धपणें करतां येत नाही. डॉ. तुळपुळे यांनी मोठ्या परिश्रमाने त्याचें वाचन करून त्यावरून कांही अनुमानें काढलीं आहेत. त्यांचा विचार व्हावा अशी त्यांनी आपल्या लेखाच्या शेवटीं इच्छा प्रदर्शित केली आहे. म्हणून त्यांतील कांही प्रश्नांविषयी येथे चार शब्द लिहिण्याचें योजिलें आहे.

या लेखाची मिति पहिल्या तीन ओळींत दिली आहे. पहिल्या ओळीच्या शेवटीं ' सकु ' अशीं अक्षरें डॉ. तुळपुळे यांनी वाचलीं आहेत, पण तीं ठशांत तरी दिसत नाहीत. दुसऱ्या व तिसऱ्या ओळींतील शब्द ' सालवण पुरि १११० सौम्ये दिवा सुक्रे ' असें त्यांनी वाचले आहेत. सालवण हें शालिवाहन याचें अपभ्रष्ट रूप आहे असें त्यांनी एका तळटीपेंत सांगितलें आहे. पण हें रूप प्राचीन लेखांत कोठे आलेलें मला माहीत नाही. ठशाचें जरा बारकाईने निरीक्षण केल्यास येथील नांव ' सालाहण ' आहे असें दिसेल. ज्याला आपण सध्या ' शालिवाहन ' म्हणतों त्याचें मूळ नांव ' सातवाहन ' असें होतें. तें नाणेघाट व नाशिक येथील लेण्यांतील लेखांत आलें आहे. याचेंच ' सादवाहन ' असें दुसरें रूप नाशिकच्या दुसऱ्या एका लेण्यांतील लेखांत, तसेंच कांही नाण्यांवर आढळतें. याशिवाय तिसरें ' सालाहण ' असें रूप कांही प्राकृत गाथांत येतें. गाथा-सप्तशतींतील क्रमांक ४६७ ची खालील गाथा पाहा—

आवण्णाइँ कुलाइं दो व्विअ जाणन्ति उण्णइं णेउम् ।
गोरीअ हिअअदइओ अहवा सालाहणणरिन्दो ॥

यामध्ये ' सालाहण ' असें रूप आलें आहे. तेंच उद्योतनसूरीच्या कुवलयमालेंत आलें आहे.[२] या रूपाचें पुढे ' शालिवाहन ' असें संस्कृतीकरण होऊन तें प्रचलित झालें. ' सालवण ' असें रूप मात्र कोठेहि येत नाही. तेव्हा येथील नांवहि ' सालाहण ' च असावें. या नांवांतील तिसरें अक्षर ' ह ' दिसतें. त्याचें पांचव्या ओळीच्या आरंभीं आलेल्या ' हा 'शीं बरेंच साम्य आहे.

'सालाहण' शब्दाच्या नंतर डॉ. तुळपुळे 'पुरि' असें वाचतात, व तो शब्द 'सौर' शब्दाचें अपभ्रष्ट रूप आहे असें मानतात. संवत्सरसंख्येपूर्वी असा शब्द आलेला मला माहीत नाही. सौर व चान्द्र असें संवत्सरगणनापद्धतींचे निदर्शक शब्द कोरीव लेखांत येत नाहीत. ' सालाहणा '-नंतर अब्दे, वत्सरे, वर्षे यासारखा किंवा यापासून निघालेला शब्द अपेक्षित आहे; पण तसा शब्द ठशावरून वाचतां येत नाही. यानंतरची संख्या त्यांनी १११० अशी वाचली आहे. यांतील पहिला, तिसरा व शेवटचा अंक बराच स्पष्ट दिसतो. दुसरा अंक मात्र अस्पष्ट आहे. पण त्याचेंहि वाचन बरोबर असावें. पुढील शब्द सौम्ये असा वाचून डॉ. तुळपुळे यांनी तें संवत्सर-

१. म. सा. प., वर्ष ३०, अंक ११७, पृ. २६–३३.
२. काव्यमीमांसा, गायकवाड्स् ओरिएंटल सीरिज, नोट्स् पृ. १२.

नाम धरलें आहे. दाक्षिणात्य पद्धतीप्रमाणे शके १११० ला सौम्य संवत्सर येत नसून कीलक येतो. त्याच्यानंतरच्या वर्षाचें नांव मात्र सौम्य येतें. या अडचणीचा परिहार 'संवत्सर चालू व शकाङ्क गतशकाचा असा अनेक ताम्रशिलालेखांतून आढळणारा प्रकार येथेहि आहे' असें म्हणून डॉ. तुळपुळे यांनी केला आहे; पण तो बरोबर नाही. पिल्ले जंत्रींतील किंवा आपल्या प्रचलित पंचांगांतील शकाङ्कसंख्या ही गत वर्षाचीच असते. संवत्सरनाम मात्र वर्तमान वर्षाचें असतें अशी वस्तुस्थिति आहे. तेव्हा सौम्ये हें वाचन बरोबर असल्यास ही अडचण नाहीशी होत नाही. तथापि अशा चुका कांही कोरीव लेखांत आढळतात यांत संशय नाही.[३] संवत्सरनामानंतर मास, पक्ष व तिथि यांचा उल्लेख अपेक्षित आहे. पण फक्त दिवा सुक्रे असे शब्द वाचले आहेत. ते विलक्षण वाटतात. तथापि या अस्पष्ट ठशावरून यापेक्षा निराळें वाचन सुचवितां येत नाही.

प्रस्तुत लेखांतील सालाहणाचा उल्लेख महत्त्वाचा आहे. हल्ली आपण ज्याला 'शालिवाहन शक' म्हणतों तो मूळचा शकनृपतींचा होता. तो केव्हा व कोणीं सुरू केला व त्याचा महाराष्ट्रांत कसा प्रसार झाला याचें विस्तृत विवेचन प्रस्तुत लेखकाने इतरत्र केलें आहे.[४] या शकाच्या अनेक लेखांत 'शकानामपि भूभुजाम्', 'शकनृपकालातीतसंवत्सर', 'शकनृपतिराज्याभिषेकसंवत्सर', 'शकवर्ष' इत्यादि शब्दांनी तो आरंभीं शकराजांनी सुरू केला होता हें दर्शविलें आहे. किंबहुना, शक हा शब्दहि 'काल' या अर्थी मराठींत सुरू झाला याचें कारणहि हेंच आहे. वराहमिहिर व कल्हण यांनीहि या कालाचें शककर्तृकत्व आपल्या ग्रंथांत उल्लेखिलें आहे. पुढे हळूहळू या कालाचा शालिवाहन राजाशीं संबंध जोडण्यांत आला. यादवांच्या अनेक लेखांत या कालाच्या वर्षाचा निर्देश करतांना 'शकनृपकालातीतसंवत्सर' असाच शब्दप्रयोग केलेला आढळतो. उदाहरणार्थ, रामदेवराव यादवाच्या कारकीर्दीच्या अखेरीस शके १२२२ मध्ये दिलेल्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटाच्या ३३ व्या ओळींत कालाचा असाच निर्देश आहे[५]. ठाणें येथे सापडलेल्या त्याच्या शके ११९४ च्या ताम्रपटांत मात्र 'शालिवाहन शके ११९४' असा कालनिर्देश होता असें त्या ताम्रपटाचें जें वाचन प्रसिद्ध झालें आहे त्यावरून समजलें जातें.[६] हा ताम्रपट आता उपलब्ध नाही. त्याच्या वाचनाबरोबर त्याचा ठसा प्रसिद्ध झाला नव्हता. म्हणून हें वाचन बरोबर होतें, किंवा वाचणाऱ्याने स्वतः शालिवाहन हा शब्द त्यांत घातला हें समजण्यास साधन नाही. तत्कालीन यादवांच्याच नव्हे तर इतर राजवंशांच्याहि कोरीव लेखांत शालिवाहनाचा उल्लेख येत नाही म्हणून दुसराच पक्ष संभवनीय वाटतो. त्यानंतर विजयनगराच्या राजांच्या कांही लेखांत मात्र कालनिर्देश करतांना 'शालिवाहना'चा उल्लेख केलेला आढळतो.[७] म्हणून त्या राजांच्या काळीं हिंदु धर्माच्या पुनरुज्जीवनाची जी लाट उसळली होती तिच्यामुळे या काळाचा संबंध शालिवाहनाशीं जोडण्यांत आला असें कांहींनी प्रतिपादिलें होतें. हें मत बरोबर असल्यास प्रस्तुत लेखांत सालाहणाचा (शालिवाहनाचा) उल्लेख असल्यामुळे त्याच्या खरेपणाविषयी शंका उत्पन्न होईल. पण अलीकडे श्री. ग. ह. खरे यांनी यादवनृपतिकृष्ण याच्या काळचा शके ११७२ चा तासगांव-ताम्रपट प्रसिद्ध केला आहे.[८] त्याच्या

३. कॉर्पस् इन्स्क्रिप्शन्स् इंडिकॅरम्, पु. ४, पृ. ५७० व ५७६ पाहा.
४. संशोधनमुक्तावलि, सर पहिला, पृ. १५१–१५८.
५. एपिग्राफिया इंडिका, पु. २५, पृ. २११.
६. कीलहॉर्न्ची दक्षिणेंतील कोरीव लेखांची यादी, क्रमांक ३७०.
७. पूर्वोक्त, क्रमांक ४६५ व ४७५ पाहा.
८. द. म. इ. साधनें, खं. ३, पृ. ६५.

आरंभीच्या श्लोकात 'स्वस्ति श्रीमति शालवाहनशके' असा कालाचा स्पष्ट निर्देश आहे. त्यावरून यादवकालांतच 'हा काल शालिवाहनाने सुरू केला' असें मत प्रचलित होऊं लागलें होतें असें दिसतें. आतापर्यंत शालिवाहनाचा उल्लेख असलेला शके ११७२ चा हाच पहिला कोरीव लेख असें मानण्यांत येत असे. डॉ. तुळपुळे यांनी प्रसिद्ध केलेला शके १११० चा प्रस्तुत लेख हा ६२ वर्षें अगोदरचा आहे या कारणानेहि त्याचें महत्त्व आहे. त्यांत 'शालिवाहना'चें 'सालाहण' असें प्राचीन रूप दिसावें हें योग्यच होय.

विवेचनाच्या ओघांत डॉ. तुळपुळे यांनी शके ४३८ मधील पाण्डरङ्गपल्ली, जयद्विट्ठ व पंडराधीशेन या शब्दांचा उल्लेख केला आहे व त्यावरून पंढरपुरांत विठ्ठलभक्ति फार प्राचीन काळापासून (कदाचित् ६ व्या शतकापासून) चालू होती असें अनुमान केलें आहे. प्रस्तुत शिलालेखाच्या अर्थाशीं त्याचा घनिष्ठ संबंध नाही. तथापि पंढरपूरच्या व विठ्ठलदेवतेच्या प्राचीनत्वाच्या बाबतींत या ताम्रपटाचा उल्लेख आणखी दोन संशोधकांनी—डॉ. सालेतोर व श्री. ग. ह. खरे यांनी—केला असल्यामुळे त्याविषयी चार शब्द लिहिणें प्राप्त आहे.

हा ताम्रपट कोल्हापूरजवळच्या एका खेड्यांत सापडला होता. तो प्रो. कुंदनगार व फादर हेरास यांच्या मार्फत म्हैसूरचे डॉ. कृष्ण यांच्याकडे गेला. त्यांनी तो ठशासह म्हैसूर आर्किऑलॉजिकल सर्व्हेच्या सन १९२९ च्या वार्षिक अहवालांत (पृ. १९७-२०८) प्रसिद्ध केला आहे. या लेखांत कोणत्याहि शकाचा निर्देश नाही. तथापि त्यांत उल्लेखिलेला राष्ट्रकूटवंशाचा मूळ पुरुष मानाङ्क हा वाकाटक हरिषेणाच्या (सुमारें इ. स. ४६०)[९] अगोदर होऊन गेला असणें शक्य नाही. त्याचा काल सुमारें ई. स. ४७० असावा. तो ताम्रपट मानाङ्काचा नातू अविधेय याने दिला होता. तेव्हा त्याचा काल इ. स. ५०० ते ५२० हा असावा. या ताम्रपटांत भाद्रपद संवत्सराचा निर्देश आहे. हें संवत्सर गुरूच्या द्वादशसंवत्सरचक्रांतील असलें पाहिजे. तें सुमारें १० एप्रिल इ. स. ५१६ या वर्षी सुरू झालें, अशा अनुमानपरंपरेने या कोल्हापूर-ताम्रपटाचा काळ डॉ. कृष्ण यांनी इ. स. ५१६ किंवा शके ४३८ असा ठरविला होता. तोच डॉ. सालेतोर[१०], श्री. ग. ह. खरे[११] यांनी पूर्वी व डॉ. तुळपुळे यांनी आता स्वीकारला आहे. मागे डॉ. कृष्ण व डॉ. अळतेकर यांच्यामध्ये या राष्ट्रकूटांच्या साम्राज्यविस्ताराबद्दल व काळाबद्दल वाद झाला होता. त्या निमित्ताने मला या ताम्रपटाचा बारकाईने अभ्यास करावा लागला. त्यानंतर या राष्ट्रकूटांसंबंधी 'मानपूरचे राष्ट्रकूट' या शीर्षकाचा लेख मी भांडारकर प्राच्यविद्या मंदिराच्या ॲनल्स्‌मध्ये[१२] व भारत इतिहास संशोधन मंडळाच्या त्रैमासिकांत[१३] प्रसिद्ध केला. त्यामध्ये डॉ. कृष्ण यांच्या मताचें व वाचनाचें परीक्षण केलें होतें. त्याची पुनरुक्ति येथे करीत नाही. पण थोडक्यांत सांगतों की, हे राष्ट्रकूट वाकाटकांनंतर उदयास आले नसून ते त्यांचे समकालीन होते. अर्थातच ते चौथ्या-पांचव्या शतकांत महाराष्ट्रांत राज्य करीत होते. वाकाटकांच्या लेखांत कुन्तलेशांचा पराभव केल्याचा व कुन्तल राजकन्येशीं विवाह केल्याचा

९. हरिषेणाचा हा काळ बरोबर वाटत नाही. तो इ. स. ४७५ ते ५०० या काळांत होऊन गेला असावा. कांहींच्या मतें तो ५०० ते ५२० या काळांत राज्य करीत असावा.

१०. इंडियन् हिस्टॉरिकल् क्वार्टर्ली, पु. ११, पृ. ७६९–७७८.

११. श्रीविठ्ठल आणि पंढरपूर, प्रथमावृत्ति, पृ. ७.

१२. ॲनल्स्, पु. २५, पृ. ३६–५०.

१३. भा. इ. सं. मं. त्रै., पु. २८, पृ. १.

उल्लेख येतो तो या राष्ट्रकूटांविषयीं असावा. कालिदास विक्रमादित्याचा दूत म्हणून कुन्तलेशाच्या दरबारीं गेला होता व पुढे त्याने 'कुन्तलेश्वरदौत्य' नामक ग्रंथ लिहिला अशी आख्यायिका अनेक प्राचीन संस्कृत ग्रंथांत उल्लेखिलेली आढळते. तींतील कुन्तलेश म्हणजे हे राष्ट्रकूट असावे असेंहि त्या लेखांत दाखविलें होतें.[१४] हें मत आता अनेकांनी मान्य केलें आहे. त्या लेखांत मी डॉ. कृष्ण यांच्या वाचनांतहि कांही दुरुस्त्या सुचविल्या होत्या. त्या सर्वांचा निर्देश येथे करण्याची आवश्यकता नाही. तथापि जयद्विट्ठ व पण्डराद्रिशेन यांमध्ये विठ्ठल व पंढरपूरचा उल्लेख आला आहे असें मानण्यांत येतें, तेव्हा त्या शब्दांच्या वाचनाचा विचार करूं.

कोल्हापूर-ताम्रपटाच्या १३ ते १७ या ओळींचे वाचन डॉ. कृष्ण यांनी पुढीलप्रमाणे केलें आहे–

'तत्वज्ञानविपश्चिते भार्गवसगोत्राय जयद्विट्ठायोपविद्ररस्थानाभिषिक्ताय छन्दोगाय विसदत्रिविद्याय चतुःवेदपण्डितायातिधर्मिणे ब्राह्मणशतामधेशद्रिरिदाविनयाग्रष्टभरतवाक्याएदमष्टधेमासपिण्डादात्मनः प्रजायशोभिवृद्धये....'

हें वाचन अत्यंत असमाधानकारक आहे हें उघड आहे. या ताम्रपटाच्या दुसऱ्या पत्राच्या पहिल्या बाजूवरील कांही ओळी आता अस्पष्ट झाल्या आहेत. कांही ठिकाणीं लेखकाने घसीटी लिपींत लिहिल्याने अक्षरें वाचणें कठीण जातें. हा ताम्रपट अत्यंत प्राचीन असल्याने त्याचें शक्यतों निर्दोष वाचन होणें अवश्य आहे. पण तो आता गहाळ झाला आहे. डॉ. कृष्णांनी आपल्या लेखाबरोबर छापलेले ठसेहि कांही ठिकाणीं अस्पष्ट आहेत. तेव्हा त्यांवरून शुद्ध वाचन करणें कठीण आहे. तथापि सध्याच्या परिस्थितींतहि कांही दुरुस्त्या सुचवितां येतील. चौदाव्या ओळींत जयद्विट्ठ असें वाचून डॉ. कृष्णांनी तें दान दिलेल्या ब्राह्मणाचें नांव मानलें आहे. या ठिकाणचा ठसा अत्यंत अस्पष्ट असल्याने हीं अक्षरें त्यावरून वाचतां येत नाहीत. तथापि दान दिलेल्या ब्राह्मणाचें नांव या ठिकाणीं आलें असणें शक्य नाही एवढें मात्र निश्चित. तें नांव पुढे ब्राह्मण या शब्दापुढे आलें असलें पाहिजे. ब्राह्मणनामनिर्देशाचा हा प्रकार अनेक प्राचीन ताम्रपटांत आढळतो. उदाहरणार्थ, कलेचुरि नृपति बुद्ध राजाच्या वडनेर ताम्रपटांतील (इ. स. ६१०) 'ब्राह्मणबोधस्वामिने' हा निर्देश पाहा.[१५] पुढे 'स्थानाभिषिक्ताय' याच्या ठिकाणीं 'स्थानाभिजनाय', 'मासपिण्डादात्मनः प्रजायशोभिवृद्धये' याच्याबद्दल 'मातापित्रोरात्मनश्च पुण्ययशोभिवृद्धये' असें वाचलें पाहिजे, हेंहि ठशावरून स्पष्ट दिसतें. तेव्हा डॉ. कृष्णांनी वाचलेल्या जयद्विट्ठ या नांवावरून इ. स. च्या सहाव्या शतकांत विठ्ठलाचें नांव प्रसिद्ध होतें असें या लेखावरून तरी म्हणतां येत नाही.

कोल्हापूर-ताम्रपटाच्या शेवटच्या ओळीच्या अखेरीस डॉ. कृष्ण यांनी पण्डराद्रिशेन असें वाचून 'पण्हराधीशेन' अशी दुरुस्ती सुचविली होती. या वाचनावरून त्यांनी पंढरपुराचें पूर्वीचें नांव पंडर होतें असा तर्क केला आहे. या वाचनाचाहि प्रकार असाच आहे. तेथील अक्षरांचें खरें वाचन 'पण्डराद्रिशेन' असें नसून 'सं १० (+) ५ कार्त्तिक व ५' असें आहे व त्यांत 'अविधेयाच्या कारकीर्दीचें पंधरावें वर्ष, कार्त्तिक बहुल (कृष्ण) पक्षाची पंचमी' असा

(पुढील मजकूर पान २५ वर पहा)

१४. याविषयी सविस्तर माहिती 'कालिदासाचें कुन्तलेश्वरदौत्य' (संशोधनमुक्तावलि, १, पृ. ६५–७५) यांत मिळेल.

१५. कॉ. इ. इं., पु. ४, पृ. ५०.

चैतन्य देसाई

# मराठी समोच्चारित छंद

## ( १ ) घनाक्षरी

मथळ्यांतील छंद संज्ञा विशिष्टार्थी, अक्षरच्छंदाला म्हणजे अक्षरसंख्याक पद्याला अनुलक्षून वापरली आहे आणि त्यांतील ऱ्हस्वदीर्घ अक्षरांचा उच्चार लघुगुरु न करतां एक-सारखा म्हणजे फक्त लघूच किंवा गुरूच म्हणा, करावयाचा असतो म्हणून त्यांना समोच्चारित हें विशेषण येथे लावलें आहे. मराठींत समोच्चारित छंदांचें अस्तित्व फक्त प्रो. माधवराव पटवर्धन यांनी काय तें नमूद केलेलें आहे, बाकी बहुसंख्य लेखकांस समोच्चारित छंदांचें अस्तित्वच मंजूर नाही, किंबहुना ती कल्पनाच त्यांना असह्य आणि अनैसर्गिक वाटते ! ( पाहा—श्री. खाजगीवालेकृत ' मराठी छंदःशास्त्र ' पृ ८९; श्री. सहस्रबुद्धेकृत ' पद्यमीमांसा ' पृ. १४; वगैरे ). अर्थात् , ज्या विद्वानांना समोच्चारित छंदांचें अस्तित्व पृथ्वीच्या पाठीवर प्रतीतच होत नाही, त्यांना समजावण्यासाठी माझा हा प्रयत्न नाही, हें सांगणें नकोच !

संस्कृत, संस्कृतसम ( म्ह. ग्रीक, लॅटिन व पर्शिअन ) आणि संस्कृतोत्पन्न भाषांत अक्षरांचे ऱ्हस्व व दीर्घ ( क्वचित् प्लुत ) उच्चार नियमाने होतात, हें सिद्ध व प्रसिद्ध आहे. संस्कृतादि पद्यरचनेंतहि लघुगुरुनियम तसाच व अबाधित चालत असतो, हेंहि निर्विवाद आहे. संस्कृतोत्पन्न मराठीआदि भाषांत ( आणि द्राविड भाषांतहि ) पद्याला लघुगुरुव्यवस्था आहे, हें कबूल केल्यावर सुद्धा जुन्या किंवा नव्या एखाददुसऱ्या कवीने ह्या सुंदर नीतीचा भंग करून समोच्चारित छंद लिहिले आणि ते साहित्यांत रूढ झाले तर शास्त्रकारांनी त्याची कशी व्यवस्था लावावयाची, एवढाच आपल्यापुढला प्रश्न आहे.

अमुक छंद हा समोच्चारित आहे अगर कसें याबद्दल सार्वमत घेण्याचा उपद्व्याप अद्याप कोणी केलेला ऐकिवांत नाही; पण मराठी प्रमुख छंदःशास्त्रकार प्रो. माधवराव पटवर्धन यांनी ज्या अर्थी अशा छंदांची दखल घेतली आहे, त्या अर्थी समोच्चारित छंद त्यांच्या श्रवणांत आले होते, ही गोष्ट निश्चित. व्यक्तिशः बोलावयाचें तर आतापर्यंत अनेकांच्या तोंडून समो-च्चारित प्रकार मींहि ऐकलेले आहेत. हा ' तोंडी ' आधार देण्याचें कारण एवढेंच की, हा वाद फक्त उच्चाराच्या म्हणजे ' म्हणण्या 'च्या पद्धतीबद्दलच आहे.

समोच्चारित छंद संख्येने जास्त नाहीत आणि त्यांतील रचनाहि विशाल नाही, तथापि त्यामुळे त्यांना अनुल्लेखाने ठार मारणें केव्हाहि अयोग्यच होईल. उलट, एखादी विलक्षण व विरळ व्यक्ति Species सापडली म्हणजे प्राणिशास्त्रज्ञास मोठा हर्ष होतो आणि त्याची व्यवस्था करण्यासाठी तो आणखी एक वर्ग ( Natural order ) खोलतो. पूर्वापार प्रचलित व्यवस्थेशीं या नव्या प्राण्याचा मेळ बसत नाही म्हणून त्याला गोळी घालावी किंवा त्याला पाहून डोळे झाकावे, असें वैज्ञानिक कधी स्वप्नांतहि आणणार नाहीत; उलट, त्या विलक्षण नमुन्याची जपणूक करण्याचीच व्यवस्था करतील. विरळा व विलक्षण छंदांबद्दल छंदःशास्त्र-कारांना तरी त्या प्राणिशास्त्रज्ञापेक्षा निराळी दृष्टि कशी असूं शकेल !

## ( २ ) अन्य भाषांतील समोच्चारित छंद

संस्कृतोत्पन्न प्रचलित अन्य भाषा आहेत, त्यांतहि जर असल्या जातीचे छंद असतील, तर ते मराठींतहि असण्याच्या शक्यतेला त्यामुळे एक पुष्टि मिळेल आणि दुसरें म्हणजे त्यांच्या अस्तित्वाच्या नुसत्या समाचारानेच ज्यांचा थरकाप होतो, त्यांनाहि थोडासा दिलासा मिळण्यास मदत होईल.

मराठीच्या बहिणी हिंदी व गुजराती भाषांत समोच्चारित छंदाची जुनी रचना सापडते. आपल्या मराठी छंदःशास्त्रकाराप्रमाणे हिंदी-गुजराती छंदःशास्त्रकारांनीहि त्याकडे दुर्लक्ष केलेलें आहे. हिंदींतील एक प्रसिद्ध उदाहरण खालीलप्रमाणे आहे. ( त्याच्याखालील गुजराथी उदाहरण माझे एक दिवंगत गुर्जर स्नेही विद्वान् **रामनारायण पाठक** यांनी मला पाठविलें होतें. )

ताराकी ज्योतमें चंद्र छुपे नहीं,
सूर छुपे नहीं बादर छायो ।
चंचल नारीको नैन छुपे नहीं,
दाता छुपे नहीं मांगन आयो ।
रन चढयो रजपूत छुपे नहीं,
प्रीत छुपे नहीं, पूंठ दिखायो ।
कहे कवि गंग सुणो शाह अक्बर,
कर्म छुपे न भभूत लगायो ।। १ ।।

यांतील दरेक अक्षर एकसारख्या कालमानाचें वाचावयाचें आहे, म्हणजे दरेक अक्षर लघु ( एकमात्रिक ) वा गुरु ( द्विमात्रिक ) आहे, असें म्हणतां येईल. गण त्र्यक्षरी व सहा मात्रांचा. दरेक चरणांत चार चार गण, पैकी दुसऱ्या चरणांतील शेवटचा गण द्व्यक्षरी दोन गुरूंचा व त्याच्या शेवटीं द्विमात्रिक विराम समजावा. ( सातव्या चरणांत दोन अक्षरें जास्त आहेत. ) ही रचना फार जुनी म्हणजे अकबरकालीन आहे. अर्थ सोपा असल्यामुळे देत नाही. समोच्चारित चाल वीररसाला पोषकच झाली आहे. हिंदींत आणखी उदाहरणें मिळतील. गुजरातींतील समोच्चारित छंदाचें प्रसिद्ध उदाहरण पुढीलप्रमाणे : —

एक शरणाइवाळो सात वर्षसुधी शीखी ।
राग–रागणी वगाडवामां वखणाणो छे ।। १ ।।
एकनेज जाचुं एवी टेक छेक राखी एक,
शेठने रीझावी मोज लेवाने मंडाणो छे ।। २ ।।
कहे दलपत पछी बोल्यो ते कंजुस शेठ,
" गायक न लायक तुं फोकट फुलाणो छे ।। ३ ।।
पोलुं छे ते बोल्युं तेमां करी तें शी कारीगरी,
सांबेलुं बजावे तो हुं जाणुं के तुं शाणो छे " ।। ४ ।।

यांत प्रतिचरण चतुरक्षरी म्हणजे अष्टमात्रिक गण चार येतात. पैकी दुसऱ्या चरणांतला शेवटचा गण त्र्यक्षरी व अंतीं द्विमात्रिक विराम आहे. गुजरातींत कवि न्हानालालचे पिता कवि दलपतराम यांनी छंदःशास्त्र लिहिलें आहे, त्यांत हें उदाहरण दिलें असून, या छंदाला गुजराती छंदःशास्त्रकार ' मनहर ' वा " कपिल " ही संज्ञा देतात. ( वरील उदाहरणांतील कविता विनोदी आहे. अर्थ पुढीलप्रमाणे :—

एक सनईवाला सात वर्षेपर्यंत शिकून राग-रागिणी वाजविण्यांत वाखाणला गेला होता. कोणा एकाला आवडलेली एक चाल एकसारखी वाजवीत राहून एकदा तो एका शेठ्याला रिझविण्याचा प्रयत्न करूं लागला व स्वतःहि मौज घेऊं लागला ! ( दलपत म्हणतो– ) त्यावर तो कंजूस शेठ बोलला, “ तूं वादक चांगला नाहीस, उगाच फुलून गेला आहेस. पोकळ आहे तें वाजलें, त्यांत तूं काय मोठी कामगिरी केलीस ? मुसळ वाजवून दाखवशील तर मी समजेन की तूं शहाणा ( कुशल ) आहेस ! ” या कवितेतील विनोदी भावाला समोच्चाराची ठसक पोषकच झाली आहे.

वंगालींत जुन्या कवींनी समोच्चारित रचना केली असल्यास माझ्या जाणण्यांत नाही. पण आधुनिकपैकी जुने कवि मायकेल मधुसूदन दत्त यांचें मेघनादवध हें मोठें काव्य समोच्चारित छंदांत आहे, हें प्रसिद्धच आहे. माझ्या आठवणीप्रमाणे आपल्या वीर सावरकरांच्या ‘ गोमांतक ’ काव्यांत समोच्चारित रचना आहे, ती बंगालीच्या अनुकरणाने.

## ( ३ ) समोच्चारितांचें वाचन.

लघुगुरूप्रमाणे वाचण्याची पक्की सवय लागल्यामुळे कित्येकांना समोच्चारित पद्य वाचण्यास अवघड जाईल, अशांनी साधारण जलद आणि सारख्या वेगाने टाळ्या मारीत त्या दरेक टाळींत एक एक अक्षर सारखें वाचण्याचा प्रयत्न केल्यास समोच्चारित पद्य म्हणतां येईल. हें म्हणतांना अर्थातच ऱ्हस्वदीर्घांची पर्वा करूं नये, दरेक अक्षर ऱ्हस्वच आहे किंवा दरेक अक्षर दीर्घच आहे, अशी कल्पना करून तें म्हणत जावें. समोच्चारितांत थोडी अडचण येईल, ती ‘अ’ व ‘अ’युक्त व्यंजनाचा दीर्घ उच्चार करतांना. वरच्या उदाहरणांतील अक्षरांवर टाळी ( किंवा मात्रा ) खालीलप्रमाणे येईल :—

(१) ता रा की ज्यो त में च न्द्र छु पे न हीं ।
मात्रा = १ १ १ १ १ १ १ १ १ १ १ १
टाळी = टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा.

(२) ए क श र णा ई वा ळो सा त व र्ष सु धी शी खी ।
१ १ १ १ १ १ . १ १ १ १ १ १ १ १ १ १
टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा. टा.

वर पद्याक्षराखाली १, १ अशी अक्षरमाला दाखविली आहे, तेथे १ च्या ऐवजी २ असें, म्हणजे लघूच्या ऐवजी दरेक अक्षर गुरु धरलें तरी चालेल. वास्तविक लघु व गुरु सापेक्ष म्हणजे परस्परावलंबी मूल्यें असल्यामुळे जेथे लघुगुरुभेदच नष्ट होतो अशा ठिकाणीं सर्वच लघु किंवा सर्वच गुरु असें गणणें, यांत कांही अर्थ राहत नाही म्हणून तसें कोणी गणील तर तें लाक्षणिकच समजलें पाहिजे.

आता मराठी समोच्चारितांपैकी घनाक्षरी छंद पाहूं. घनाक्षरीच्या उच्चाराच्या दोन्ही प्रकारांतील फरक खालील उदाहरणांनी स्पष्ट होईल :—

## ( ४ ) घनाक्षरी समोच्चारित

म्ह णे भ र त हा रा म । त्रा हे त्रा हे मे घ श्या म ।
व सि ष्ठ हा गु रु ना म । तो ही म ज को प ला ऽ ॥ १ ॥

वर दिलेल्या घनाक्षरीच्या दरेक अक्षराखाली – अशी खूण ही एकमात्रिक ( लघु ) किंवा द्विमात्रिक ( गुरु ) यांपैकी कोणत्या तरी एका किमतीची धरून दरेक अक्षराचा उच्चार समकालिक करावयाचा आहे.

## ( ५ ) घनाक्षरी आणि ' मनहर ' छंद

घनाक्षरीची गुजराती ' मनहर ' छंदाशीं तुलना केल्यास दिसून येईल कीं, ते दोन्ही एकच आहेत; म्हणजे तो मराठींतून गुजरातींत गेला आहे, असेंच अनुमान निघतें. चरण, यति, यमक व चरणान्त लघुगुरु यांची व्यवस्था गुजराती घनाक्षरींत भिन्न आहे. मराठी कवींनीं घनाक्षरीचा उपयोग वीर व रौद्र रसात्मक काव्यासाठी केला आहे व समोच्चारित घनाक्षरी अशा काव्यरचनेला मराठींत तरी पोषक झाली आहे.

## ( ६ ) घनाक्षरी लघुगुरूप्रमाणे

म्ह णे भ र त हा रा म । त्रा हे त्रा हे मे घ श्या म ।
व सि ष्ठ हा गु रु ना म । तो हि म ज को प ला ऽ ।। १ ।।

घनाक्षरीच्या दोन्ही उच्चारप्रकारांत चौथ्या चरणांतीं एक-अक्षरी विराम आहे. दरेक चरणांत आठ अक्षरें येतात. अनुष्टुपाप्रमाणेच वरील उदाहरणांत – ही गुरूची खूण व ⏑ ही लघुची खूण आहे.

घनाक्षरीच्या पहिल्या तीन चरणान्तीचीं अक्षरें ऱ्हस्व व चौथ्या चरणान्तीचें दीर्घ असण्याचा नियम आहे. हीं चरणान्त ऱ्हस्वाक्षरें लघुगुरु पद्धतींतहि गुरूच वाचलीं जातात, हें सांगावयास नकोच.

वरील घनाक्षरीचें उदाहरण वामनपंडिताच्या ' भरतभाव ' मधील आहे ( नवनीत, १८८२ ची आवृत्ति; पृ. १०८ ). त्यांतील दरेक चरणांच्या मात्रा अनुक्रमें ११, १४, ११ व ११ अशा आहेत. आणखी उदाहरणें:—

( १ ) अवो कैकयी हें काय । केलें तुवां हाय हाय ।
न म्हणवे तुज माय । जन्मोजन्मीं वैरिणी ।।

( कित्ता. पृ. १०६ ) यांत चरणमात्रा १३, १३, १० व १३ आहेत.

( २ ) प्रल्हादाशीं दैत्य घोर । म्हणे मज थोर थोर ।
भीति बोलतां समोर । भें न वाटे तूजला ।।

( कित्ता पृ. ११९, वामन—' नृसिंहावतार-चरित्र ' ) यांतील चरणांची मात्रासंख्या १४, ११, १२ व १२ अशी अनुक्रमें आहे.

( ३ ) मुख सिंहाचें उत्कट । नरतनु जे विकट ।
होय नरसिंह प्रकट । विधिवर–रक्षणीं ।।

(कित्ता पृ. १२१, वामन-नृसिंहावतार-चरित्र ) चरणमात्रा १२, ९, १२, ९ आहेत. वरीलपैकी ( ३ ) मधील ' नरसिंह ' हें ' नर्सिंह ' असें वाचलें, तरच आठ अक्षरांचा नियम या चरणांत राहील.

रघुनाथ पंडित-कृत घनाक्षरी थोडी अनियमित आहे. तो रचनेचा दोषच मानावा लागेल:—

(४) तया इंद्रा करीं धरीं । अथवा तयाचे शेजारीं ।

नांदे जो तेजोनिधी भारी । तया वरीं राजसे ।। १ ।।

(नलदमयंती-स्वयंवर आख्यान)

यांत ज्याच्याखाली पूज्य दाखविलें आहे त्याचा उच्चार जोडाक्षराप्रमाणे पुढच्या अक्षरांत मिळवून वाचल्याशिवाय या ओळी 'चालीं 'त बसणार नाहीत, कारण तीं अक्षरें जास्त आहेत. अर्थात् 'तयाचे 'ऐवजी 'त्याचे ' करून व तिसऱ्या चरणांतला 'जो ' अक्षर गाळून टाकल्यास अडचण राहणार नाही. सर्वसामान्य रचनेवरून अक्षरसंख्येचा नियम सिद्ध होत असल्यामुळे, नियमाविरुद्ध रचनेंतल्या चुकांचा बचाव 'आर्ष ' वा 'शिथिलरचना ' म्हणून करण्याचें कारण नाही.

वरील उदाहरण ओवीशीं जास्त मिळतें आहे. चरणान्त्य अक्षरें दीर्घ आहेत, हाहि फरक आहे.

## (७) गुजराती घनाक्षरी.

आपल्या घनाक्षरीसारखा आणि समोच्चारित असलेला 'कपिल ' छंद वर दाखविला. त्याशिवाय गुजराती छंदःशास्त्रकारांनी घनाक्षरी छंद निराळा दिलेला आहे. कवि दलपतरामांनी त्याचे नियम व उदाहरण खालीलप्रमाणे दिलें आहेः—

चरण चरण मध्य, वरण बत्रीस वसे

विश्राम विश्राम ठाम, अक्षर ज्यां आठ आठ । वगैरे

वरील दोन्ही ओळी मिळून एक चरण बत्तीस अक्षरांचा सांगितला आहे, पण आठ किंवा सोळा अक्षरांचा एक चरण गणणें जास्त योग्य होईल. त्यांतलें सोळावें अक्षर दीर्घ व आठवें, चोविसावें व बत्तिसावें ऱ्हस्व असण्याचा नियम आहे. ही व्यवस्था मराठी घनाक्षरीहून भिन्न आहे; शिवाय मराठी घनाक्षरींत चौथा चरण सात-अक्षरी असतो, हाहि फरक आहे.

या गुजराती घनाक्षरींत अन्य सर्व अक्षरांना लघुगुरूचा नियम नसून अक्षरसंख्येचा नियम मात्र आहे, त्यामुळे हा अक्षरच्छंद होईल. कवि दलपतरामांनी दिलेले घनाक्षरीचे नियम त्यांच्या उदाहरणांत पाळलेले नाहीत; पण तें असो.

## (८) हिंदी घनाक्षरी.

"भरत सदाही पूजे पादुका उते सनेम

इते राम सीय बंधु-सहित सिधारे-बन ।"

('छंद-प्रभाकर ' पृ. २१८)

यांप्रमाणे बत्तीस-अक्षरी एक चरण व सोळा-अक्षरी यति आहे. वर दिलेली गुजराती घनाक्षरी ही मूळ हिंदींतून घेतली गेली आहे, असें दोहोंची तुलना केल्यास दिसून येईल. हिंदी घनाक्षरीहि अक्षरसंख्याक छंद आहे.

वरील हिंदी उदाहरणांत आठ अक्षरांचा चरण मानला तर मराठीप्रमाणे सात अक्षरी चाथा चरण असलेल्या घनाक्षरीचें एक उदाहरण हिंदींत मिळतें. कवि गोप—कृत समस्यापूर्तींत या घनाक्षरीचा उपयोग केला आहे. अर्थात्, हिंदी गणनेप्रमाणे हिचा ३१-अक्षरी एक चरण व चरणान्तीं यमक येतेंः—

"गोप कवि धर्मनतें, एते अवतार पेखे,

वृषभान नंदतीके, नेननमें श्यामके ।"

गुजराती वा हिंदी घनाक्षरी समोच्चारित नाही.

मराठी घनाक्षरी पहिल्याने वामन पंडितांनी लिहिली असल्यास ती त्यांनी हिंदीवरून फेरफार करून घेतली असणें अशक्य म्हणवत नाही; कारण वामन पंडितांचें अध्ययन बनारसलाच झालें होतें, त्यामुळे तत्कालीन हिंदी साहित्याशीं त्यांचा परिचय झाला असणें शक्य आहे; पण हिंदी घनाक्षरी वामनापूर्वी अस्तित्वांत होती हें यासाठी अगोदर नक्की झालें पाहिजे.

## ( ९ ) लघु-गुरु पठित घनाक्षरी हा अक्षर-छंद आहे.

ओवींतील चरणाचीं अक्षरें किंवा मात्रा अनियत असल्यामुळे ती केवळ पद्य आहे. लघुगुरुपठित घनाक्षरीची चाल ओवीसारखी वाटते, पण तिच्या चरणांची अक्षरसंख्या नियत असल्यामुळे हा घनाक्षरी-प्रकार एक छंद आहे. लघुगुरूच्या घनाक्षरींत गण तर नाहीच, पण मात्रासंख्याहि नियत नाही, त्यामुळे तिला वृत्त म्हणतां येणार नाही. वृत्तदर्पणकार के. गोडबोले यांनी घनाक्षरीला पहिल्या तीन चरणांस आठ अक्षरें व बारा मात्रा आणि चौथ्या चरणास सात अक्षरें व अकरा मात्रा असाव्या असा नियम दिला आहे. पैकी मात्राबद्दलचा नियम चूक आहे; पण दुर्दैवाने "तात्यावाक्यं प्रमाणम्" मानून रा. देशपांडे (छंदोलंकार, पृ. ८०) व श्री. वि. ज सहस्त्रबुद्धे या छंदोविद्वानांनी त्याचें गतानुगतक केलें आहे ! ('पद्यमीमांसा' पृ. ३८ ).

## ( १० ) घनाक्षरी आणि ओवी.

लघुगुरूप्रमाणे घनाक्षरी वाचल्यास ओवीपासून निराळी ओळखतां येणार नाही; पण अक्षरसंख्यानियमामुळे ती ओवीहून अलग मानावीच लागेल. अर्थात्, हा भेद तांत्रिकच राहील, म्हणजे कानांस ओळखतां येणार नाही. दोन्ही प्रकारच्या घनाक्षरीचें ओवीशीं असलेलें रचनासाम्य दाखवितें की घनाक्षरी ही ओवींतून उत्पन्न झाली आहे.

## ( ११ ) घनाक्षरी संज्ञेचा अर्थ.

घन म्हणजे दाटीने आलेल्या अक्षरांचें पद्य असा किंवा घन म्हणजे दरेक अक्षर भरीव असलेलें पद्य असा व्युत्पत्त्यर्थ केला, तर तो या पद्याच्या समोच्चाराचा सूचक होऊं शकतो. लघुगुरु एकसारख्या अवकाशांत भरले असल्यामुळे अक्षरांची दाटी झाल्यासारखें वाटतें किंवा दरेक अक्षर सारखेंच वजनदार म्हणजे भरीव वाटतें हा घन शब्दाचा अर्थ येथे घेतल्यास तो समोच्चारित पद्याला अनुकूल होईल. ● ● ●



अनुक्रमणिका

ग. वा. तगारे

# ‘मराठी’ स्वरसंधि

मराठी व्याकरणावरील पुस्तकांत ‘मराठी स्वरसंधि’ या शीर्षकाखाली संस्कृत स्वरसंधींची चर्चा करून ‘केवळ मराठीचे’ विशेष म्हणून ‘पूर्वरूप’ संधि व ‘पररूप’ संधि देण्याचा प्रघात आहे. मो. के. दामले यांनी ‘शास्त्रीय मराठी व्याकरणांत’ या पारिभाषिक शब्दांच्या पुढीलप्रमाणे व्याख्या दिल्या आहेत.[1]

“६३ (अ) स्वरसंधीमध्ये जेव्हा दोन्ही स्वरांचे जागीं पहिलाच स्वर येतो, म्हणजे दुसऱ्याचा लोप होतो तेव्हा त्या स्वरसंधीस पूर्वरूप संधि असें म्हणतात.

पूर्वरूपसंधीचीं उदाहरणें :

७०. किती + एक = कितीक (कित्येक), एक + एक = एकक (तसेंच एकेक एकैक), करितो + आहे = करितोहे.

(अ) पहिल्या शब्दान्तीचा स्वर अनुनासिक असतांहि कधी कधी पूर्वरूप संधीच होतो. जसें— कांहीं + असा = कांहींसा, चांगलें + असें = चांगलेंसें.

६३ (आ) स्वरसंधीमध्ये जेव्हा दोन्ही स्वरांच्या जागीं दुसराच स्वर येतो म्हणजे पहिल्याचा लोप होतो त्या स्वरसंधीस पररूप संधि असें म्हणतात.

६९. निव्वळ मराठी शब्दामध्ये बहुधा पररूप संधि होतो. उदा. नृप + एं = नृपें, हात + ऊन = हातून, कर + ऊन = करून, सांग + ऊं = सांगूं.”

दामले यांनी प्रस्तुत प्रकरण कृष्णशास्त्री गोडबोले यांच्या ‘नवीन मराठी व्याकरणा’वर आधारलेलें असलें तरी तो ग्रंथ (दामले–शास्त्रीय मराठी व्याकरण) विद्यापीठांच्या उच्च पदवी परीक्षा व शालेय व्याकरणकार या सर्वांनाच उपयुक्त असल्यामुळे त्यांतील अवतरण वर दिलें आहे.

मराठी व्याकरणशास्त्रावरील प्रमाणभूत मानल्या जाणाऱ्या इतर संदर्भ-ग्रंथांतहि असेंच मत व्यक्त केलें आहे. उदाहरणार्थ :

१. म. पां. सबनीस[२] : ‘पूर्वरूप व पररूप संधि केवळ मराठींत आहेत.

२. मो. स. मोने[३] : ‘पूर्वरूप’ व ‘पररूप’ संधींच्या व्याख्या :

‘निव्वळ मराठी शब्दांत केव्हा केव्हा संधियुक्त अक्षरांपैकी पहिलें अक्षर कायम राहून दुसऱ्याचा लोप होतो, त्यास पूर्वरूप संधि म्हणतात.’

---

* प्रस्तुत टिपणांत लेखकाने ‘निव्वळ मराठी’ विशेष म्हणून मानल्या जाणाऱ्या स्वरसंधींचा ऐतिहासिक भाषाशास्त्राच्या दृष्टीने विकास मांडला आहे.

१. मो. के. दामले–शास्त्रीय मराठी व्याकरण [उद्घाटन व ऊहापोह] पूर्वार्ध व उत्तरार्धासह संपूर्ण ग्रंथ. सन १९२५, प्रकाशक : के. भि. ढवळे, मुंबई.

२. आधुनिक मराठीचें उच्चतर व्याकरण, १९५१, पृ. ७५.

३. मराठी साहित्य व व्याकरण, आवृत्ति ६ वी, १९४३ (चित्रशाळा), पृ. २३९.

'निव्वळ मराठी शब्दांत केव्हा केव्हा संधियुक्त अक्षरांपैकी दुसरें अक्षर कायम राहून पहिल्याचा लोप होतो, त्यास पररूप संधि म्हणतात.'

३. मो. के. दामले[४] :

'६१.......मराठीचे दृष्टीने संस्कृतांतील संधींपैकी सामासिक शब्दांचे अवयवांमध्ये होणारे संधि हेच काय ते विशेष महत्त्वाचे होत.......तथापि मराठींतील संधि हे बहुतेक पररूप संधि आहेत.'

'६९. निव्वळ मराठीमध्यें बहुधा पररूप संधि होतो.' दादोबा पांडुरंगांनी 'अच् संधि' म्हणून दिलेले स्वरसंधि संस्कृत – तत्सम – सामासिक शब्दांसंबंधीचे आहेत. पूर्वरूप व पररूप संधींची चर्चा त्यांनी केली नसली तरी "'ईण' प्रत्यय लावतेसमयीं शब्दांच्या अंत्य स्वराचा लोप होतो" असें म्हणून मराठींत 'पररूप' संधि असल्याची जाणीव त्यांनी व्यक्त केली आहे.[५]

क्रमवंत–घगवे–फडके[६] यांनी लिहिलेल्या 'महाराष्ट्र भाषेच्या व्याकरणांत' संधि-विचार नसल्यामुळे त्या जुन्या व्याकरणकारांचें या विषयावरील मत समजण्यास मार्ग नाही. अर्वाचीन मराठीप्रमाणे यादवकालीन मराठींत पररूप संधींचें प्रमाण बरेंच असलें तरी कवणु + असे = कवणुसे, तेथु + असे = तेथुसे अशीं पूर्वरूप संधींचीं कांही उदाहरणें आढळतात[७].

भाषाशास्त्रीय इतिहासाच्या दृष्टीने विचार करतां 'पररूप' व 'पूर्वरूप' संधि या नांवांनी व्यक्त होणाऱ्या भाषिक प्रवृत्ति भारतीय आर्यभाषेच्या 'मराठी' नामक दाक्षिणात्य, अर्वाचीन भाषिक विकासांत आढळतात असें नसून, त्या भाआ. भाषेच्या (मराठीच्या) मध्यकालीन (Middle Indo-Aryan) यां अवस्थेंतहि दिसतात. मराठीच्या पूर्वी अस्तित्वांत असलेल्या 'दाक्षिणात्य' अपभ्रंशांत 'पररूप' संधींचीं पुढील उदाहरणें आढळतात—

धुत्त + इम = धुत्तिम 'धूर्तत्व', चाव + इर = चाविर 'चावरा', बहिणी + उल्ल = बहिणुल्ल 'बहीण', घग्घरा + ओली = घग्घरोली, 'घागऱ्या', पुव्व + इल्ल = पुव्विल्ल (इल्ल = मत्, 'युक्त' या अर्थी). विभक्ति व तद्धित प्रत्ययान्त पररूप संधींचें प्रमाण अधिक असून त्या मानाने सामासिक पदांत असे संधि कमी प्रमाणावर आहेत.

ही प्रवृत्ति केवळ 'दाक्षिणात्य' अपभ्रंशांत होती असें नसून 'प्राच्य' व 'पाश्चात्त्य' अपभ्रंशांतहि होती[८]. तसेंच मध्ययुगीन भारतीय भाषान्तर्गत प्राकृतांतहि ती आढळते. डॉ. गुलाब दवणे लिहितात[९] :

---

४. शास्त्रीय मराठी व्याकरण, इ. स. १९२५, अध्याय ५ वा.

५. महाराष्ट्र भाषेचें व्याकरण, ९ वी आवृत्ति, १८८९, पृ. ३६, नियम ११७.

६. महाराष्ट्र भाषेचें व्याकरण, संपादक अ. का. प्रियोळकर, १९५४.

७. शं. गो. तुळपुळे—यादवकालीन मराठी भाषा, १९४२, पृ. २९३.

८. ग. वा. तगारे–**A Historical Grammar of Apabhrams'a** Poona, 1948, पृ. ३३५-४२, तसेंच प्रत्ययप्रक्रियेवरील प्रकरण व Index Verborum. पाहा.

९. गुलाब दवणे—**Nominal Composition in Middle Indo-Aryan** Poona. 1956, पृ. १४९, नियम १०, ८.

कांही प्राकृत समासांत मभाआ. ( मध्ययुगीन भारतीय आर्य ) संधिनियम पाळण्यांत येतो म्हणजे समासांतील दुसऱ्या पदांतील आद्याक्षर जर स्वर असेल तर पहिल्या पदांतील अंत्य स्वराचा लोप होतो. उदाहरणार्थ :

अहि + इंद = अहिंद ' अहींद्र, सर्पराज ',
कुंभ + उब्भव = कुंभुब्भव ' कुम्भोद्भव, अगस्त्य ',
माआ + इंदजाल = माइंदजाल ' मायेन्द्रजाल ',
कुल + इंगाल = कुलिंगाल ' कुलांगार ',

मभाआ. अवस्थेंतील स्वरसंधींत आपल्याला ३ प्रकार आढळतात : (१) संस्कृत-सारखे स्वरसंधि, (२) स्वरसंधींचा अभाव, (३) मराठीसारखा ' पररूप ' संधि.

महाराष्ट्राबाहेर विकसित व ग्रंथनिबद्ध झालेली प्राचीन मभाआ. ' अर्धमागधी ' यामध्ये आपल्यास ' पररूप ' संधि आढळतात. उदाहरणार्थ :

| | |
|---|---|
| अ, आ + इ, ई = ई : | तियस + ईस = तियसीस ( त्रिदशेश = इंद्र ) |
| | राय + ईसर = राईसर ' राजेश्वर ' |
| अ, आ + ऊ = ऊ : | महा + ऊसव = महूसव ' महोत्सव ' |
| | एग + ऊण = एगूण ' एकूण ' |
| अ, आ + ए = ए : | इह + एव = इहेव ( इहैव = येथेच ) |
| | कमेण + एव = कमेणेव ( क्रमेणैव = क्रमानेच ) |
| अ, आ + ओ = ओ : | जल + ओहं = जलोह ' जलौघ ' |
| | महा + ओसहि = महोसहि ' महौषधि ' |

पुष्कळदा अर्धमागधी पद्यांत पूर्वस्वर दीर्घ असल्यास पुढील ऱ्हस्व स्वराचा लोप होऊन ' पूर्वरूप' संधि होतो.[११]

महाराष्ट्राबाहेर विकसित होऊन ग्रंथनिबद्ध झालेली दुसरी प्राचीन मभाआ. पाली. बौद्धांच्या या धर्मभाषेंतहि या भाषिक प्रवृत्ति सापडतात. ' सद्नीति 'कारांनी स्वरसंधीं-बद्दल लिहितांना पालीमध्ये सामान्यतः ' पररूप ' संधि होतो असें सांगितलें आहे.[१२] दवणे-बाईनी आपल्या प्रबंधांत पाली समासांत आढळणाऱ्या स्वरसंधींचीं पुढील उदाहरणें दिलीं आहेत.[१३]

अच्छ + उदकिका = अच्छुदकिका ' स्वच्छ पाण्याची नदी '
अजा + एळका = अजेळका ' शेळ्या-मेंढ्या '
अक्खि + अंजन = अक्खंजन ' डोळ्यांत घालावयाचें अंजन '
आवेणी + उपोसथ = आवेणुपोसथ ' एक प्रकारचें उपोषण '
ऊरु + अट्ठिक = ऊरट्ठिक ' मांडीचें हाड '

---

१०. अ. म. घाटगे—**Introduction to Ardha Magadhi**, कोल्हापूर, ४ थी आवृत्ति, १९५१, नियम १३६.
११. अ. म. घाटगे—उपर्युक्त, नियम १३९.
१२. Helmer Smith—**Pali Saddaniti** ( Oxford Uni. Press, 1928).
१३. **Nominal Composition in Middle Indo-Aryan 30. § 10.2**, पृ. १४४.

क्वचित् प्रसंगीं आपल्यास पूर्वरूप संधींचींहि उदाहरणें आढळतात. उदा.–

( १ ) – उ + इ– = उ : बहु + इत्थिक = बहुत्थिक 'पुष्कळ स्त्रिया असलेला'
चक्खु + इंद्रिअ = चक्खुंदिय 'डोळा'

( २ ) – इ + अ– = इ : द्वि + अह = द्विह (द्विधा ?)

### सारांश

( १ ) 'पूर्वरूप' संधि व 'पररूप' संधि या नांवाने ओळखल्या जाणाऱ्या भाषिक प्रवृत्ति 'निव्वळ मराठी' वैशिष्ट्यें नाहीत.

( २ ) मराठीच्या पूर्वी असलेल्या 'दाक्षिणात्य' अपभ्रंशांत व इतर प्रांतांतील अपभ्रंशांत या प्रवृत्ति होत्या.

( ३ ) अपभ्रंशापूर्वी अस्तित्वांत असणाऱ्या मभाआं.त–प्राकृतांत–या प्रवृत्ति आहेत.

( ४ ) महाराष्ट्राबाहेर विकसित व ग्रंथनिविष्ट झालेल्या 'पाली' व 'अर्धमागधी' या मभाआ.च्या अधिक जुन्या स्वरूपांतहि या प्रवृत्ति सापडतात.

अपभ्रंशावरील माझ्या उपर्युक्त प्रबंधांत ( § १८, पृ. ४९–५१ ) मराठीपूर्व काळांत शब्दांचा अंत्य अवयव निराघात उच्चारला जाऊन अभाआं.त ( मराठी, हिंदी इ. मध्ये ) तो प्रत्यक्ष उच्चारांतून नष्ट झाल्याचें दाखविलें आहे. त्यामुळे स्वरादि प्रत्यय किंवा स्वरादि द्वितीय-पद आलें असतां ( उदा. घर + एं = घरें, घर + ई = घरीं, हात + ऊन = हातून, रात + अंधळ = रातंधळ असे ) 'पररूप' संधि होणें स्वाभाविक आहे. या दोन्ही संधींचा स्वराघाताशीं संबंध असावा. परंतु मराठी स्वराघातावर नीट संशोधन झालें नसल्यामुळे एक उपपत्ति एवढेंच या तर्काला महत्त्व. हे संधि मराठी व्याकरणकार मानतात तसे 'निव्वळ मराठी' नाहीत, एवढें निश्चित. ● ● ●



अनुक्रमणिका

गणेश त्र्यंबक देशपांडे

# ध्वन्यालोकाची तत्कालीन साहित्यविषयक पार्श्वभूमि

साहित्यशास्त्रीय ग्रंथांत आनंदवर्धनाच्या ध्वन्यालोकाचें अनन्यसाधारण महत्त्व आहे. या ग्रंथाने साहित्यसमीक्षेंत विलक्षण क्रान्ति घडवून आणली. आनंदवर्धनापूर्वीच्या साहित्य-मीमांसेंत वाच्यवाचकांचें सौन्दर्य किंवा संघटनेचें सौन्दर्य हाच काव्याचा निकष मानला जात असे. वाच्यवाचकांच्या सौंदर्यात शब्दार्थालंकारांचा अंतर्भाव होई व संघटनेच्या सौंदर्यात रीति व उपनागरकादि वृत्ति यांचा समावेश होई. महाकाव्यें आणि संदर्भकाव्यें यांच्या बाबतींत रसानुकूलता किंवा औचित्य यापेक्षा वर्णनें, अलंकार, चित्र, शास्त्रीय तंत्र इत्यादिकांवरच भर देण्यांत येत असे. साहित्यिकांमध्ये ही दुष्प्रवृत्ति आनंदवर्धनापूर्वींच निर्माण झाली होती व आनंदवर्धनाच्या काळीं तर तिचा कळस झालेला दिसत होता. कवींच्या काव्य-निर्मितीला लागलेलें हें वळण कसें घातक आहे; त्यामुळे केवळ वेगडी साहित्यच कसें निर्माण होत आहे; केवळ पद्यांच्या संख्याबलावर, रचनेच्या दीर्घपणावर आणि चित्ररचनेच्या कौशल्यावर, वर्तमान कवि कालिदास-सर्वसेनादिकांच्या पंक्तीला बसण्याचा हव्यास कसा धरीत आहेत; या गोष्टी आनंदवर्धनाला प्रत्यहीं दिसत होत्या. आपल्या ग्रंथाचा हेतु विशद करतांना एके ठिकाणीं आनंदवर्धन म्हणतो, "आम्ही हा जो एवढा ग्रंथलेखनाचा खटाटोप करीत आहोंत तो केवळ ध्वनीचें प्रतिपादन अभिनिवेशाने करण्याकरिता म्हणून नव्हे, तर कवींमध्ये ( रसिकांमध्येहि ) जी अनिष्ट प्रवृत्ति बोकाळतांना दिसत आहे ती घालवून, सत्काव्याचें पर्यवसान रसादिकांत होणेंच कसें युक्त आहे आणि आपलें काव्य निर्मितांना कवीने रसपरतंत्र असणेंच कसें इष्ट आहे हें दाखविण्याकरिताच आम्हीं हा प्रयत्न आरंभिला आहे."[1]

महाकवित्वाकरिता खरोखरी कशाची आवश्यकता आहे, आणि याउलट महाकवित्व आपणांस प्राप्त व्हावें म्हणून कवींची आज कसल्या प्रकारची धडपड चालतांना दिसत आहे, या बाबतींत आनंदवर्धनाचे उद्गार ध्वन्यालोकांत सर्वत्र विखुरलेले आहेत. विशेषतः तिसऱ्या उद्योतांत ध्वनीचें व्यंजकमुखाने विवेचन करतांना तर ते जागोजाग आलेले आढळतात. त्यांपैकी कांही उद्गार असे–

(१) नानाप्रकारचे शब्द, अर्थ आणि संघटना यांच्या प्रपंचामुळे मनोहर भासणाऱ्या काव्याचा खरोखरी सारभूत अर्थ रस हाच आहे. प्रतीयमानाचे ( ध्वनीचे ) इतर भेद (वस्तु, अलंकार ) सांगितलेले असले तरीहि त्यांच्या ठिकाणीं रसभावमुखानेच ( ते रसपर्यवसायी असतात तेव्हाच ) प्राधान्य येतें. या आस्वादरूप ( रसभावरूप ) अर्थतत्त्वाला प्रवाहित करणारी महाकवींची वाणीच त्यांच्या प्रतिभाविशेषालाहि व्यक्त करीत असते. नानाविध कविपरंपरांनी युक्त असलेल्या या ( साहित्य )–संसारप्रवाहांत अशा प्रतिभाविशेषामुळेच

१. अत एव च इतिवृत्तमात्रवर्णनप्राधान्येऽङ्गाङ्गिभावरहितरसभावनिबंधनेन च कवीनामेवंविधानि स्खलितानि भवन्ति इति रसादिरूपव्यंग्यतात्पर्यमेव एषां युक्तम् इति यत्नोऽस्माभिरारब्धो, न ध्वनिप्रतिपादनमात्राभिनिवेशेन । ( ३।१९ वरील वृत्ति )

अनुक्रमणिका

कालिदासासारखे दोन-तीन किंवा फारतर पांचसहाच कवि महाकावि म्हणून ओळखले जातात.[२]

(२) काव्यनिर्मिति करतांना कवीला सर्वथा रसपरतंत्रच असलें पाहिजे...कवीला केवळ इतिवृत्त सांगावयाचें नसतें; तें काम इतिहासानेच केलेलें असतें....तसेंच शास्त्रामध्ये कथारचनेचे नियम सांगितलेले असतात, त्यांचें पालनसुद्धा रसाभिव्यक्तीच्या अपेक्षेनेच करावयाचें असतें; केवळ शास्त्राचें तंत्र सांभाळावें म्हणून नव्हे....आपणांला अलंकार कल्पितां येतात म्हणून कवींनी अलंकार आणू नयेत, रसाला ते अनुरूप असतील तरच त्यांची योजना करावी. अलंकाररचनेचें सामर्थ्य ज्यांना आहे असे कवि केव्हा केव्हा अलंकाररचनेंत मग्न होतात आणि रसाभिव्यक्तीची पर्वा न करितां प्रबंध रचूं लागतात. अशांना आमचें हें मुद्दाम सांगणें आहे. काव्यांतून रसाभिव्यक्ति होते किंवा नाही याची मुळीच चिंता न करतां केवळ अलंकार-निबंधनांतच आनंद मानणारे कवि अनेकदा पाहण्यांत येतात.[३]

(३) केवळ वाच्यवाचकांवर श्रम केल्याने काव्यार्थप्रतीति येत नाही. त्याकरिता काव्यार्थतत्त्वाचीच जाणीव असावी लागते.[४]

(४) कवीच्या काव्यांत एक तर प्रतिभाहीनतेमुळे दोष होतात किंवा व्युत्पत्तिहीनतेमुळे झालेले दोष दिसून येतात. त्यांत अव्युत्पत्तीमुळे झालेले दोष, कवीच्या अंगीं प्रतिभाशक्ति असेल तर, निदान कांही अंशीं झाकले तरी जातात; पण प्रतिभाहीनतेमुळे झालेला दोष तात्काळच प्रकट व्हावयास लागतो.[५]

हीं आणि अशाच प्रकारचीं अनेक वचनें ध्वन्यालोकांत ठिकठिकाणीं विखुरलेलीं आहेत, त्यावरून आनंदवर्धनाच्या काळीं महाकावि म्हणविणाऱ्यांच्या ठिकाणींसुद्धा साहित्यविषयक कोणत्या दुष्प्रवृत्ति बळावत चालल्या होत्या याचा कांहीसा अंदाज बांधतां येतो. त्यांत कांही अंदाज असे-

सर्वसेन, कालिदास, प्रवरसेन आदि महाकवींचीं काव्यें संस्कृत-प्राकृतांतील अभिजात व आदर्श महाकाव्यें आहेत असें आनंदवर्धन मानतो. कालिदास हा तर प्रतिभावान् कवींचा मुकुटमणीच होय. त्याच्या काव्यांत नांवालासुद्धा दोष नाही असें नाही; पण त्यांत सापडणारे

---

२. विविधवाच्यवाचकरचनाप्रपंचचारुणः काव्यस्य स एवार्थः सारभूतः ।........ प्रतीयमानस्य चान्यभेददर्शनेऽपि रसभावमुखेनैवोपलक्षणं प्राधान्यात् ।........ तद्वस्तुतत्त्वं निष्यन्दमाना महतां कवीनां भारती अलोकसामान्यं प्रतिभाविशेषं परिस्फुरन्तमभिव्यनक्ति। येनास्मिन्नतिविचित्रकविपरंपरावाहिनी संसारे कालिदासप्रभृतयो द्वित्राः पंचषाः वा महाकवय इति गण्यन्ते । ( १.५,६ वरील वृत्ति )

३. कविना काव्यमुपनिबध्नता सर्वात्मना रसपरतंत्रेण भवितव्यम् । न हि कवेः इति-वृत्तमात्रनिर्वहणेन किंचित् प्रयोजनम्, इतिहासादेव तरिसद्धेः । .......संधीनां तदंगानां च घटनं रसाभिव्यक्त्यपेक्षया, न तु केवलं शास्त्रस्थितिसंपादनेच्छया । ....... अलंकृतीनां शक्तावप्यानुरूप्येण योजनम् । शक्तो हि कविः कदाचिदलंकारनिबंधने तदाक्षिततया एव अनपेक्षितरसबंधः प्रबंधमारभते तदुपदेशार्थमिदमुक्तम् । दृश्यन्ते हि कवयोऽलंकारनिबंध-नैकरसाः अनपेक्षितरसाः प्रबंधेषु । ( ३।१४ वरील वृत्ति )

४. शब्दार्थशासनज्ञानमात्रेणैव न वेद्यते ।
वेद्यते स तु काव्यार्थतत्त्वज्ञैरेव केवलम् ॥ ( १।७ ).

५. अव्युत्पत्तिकृतो दोषो शक्त्या संव्रियते कवेः ।
यस्त्वशक्तिकृतस्तस्य स झटित्यवभासते ॥ ( ३।४ च्या वृत्तींतील परिकर श्लोक ).

तुरळक दोष हे अव्युत्पत्तीमुळे झालेले आहेत; व असे दोष त्याच्या प्रतिभेच्या तेजासमोर झाकले जातात[६]. कालिदासाने विदग्ध महाकाव्याचा आदर्श घालून दिला. या महाकवीच्या पावलावर पाऊल टाकून महाकवित्वाची कीर्ति मिळवूं पाहणारे अनेक कवि त्याच्या पश्चात् झाले. पण त्यांनी आपल्या काव्यरचनेंत रसभावादिकांच्या अभिव्यक्तीवर आपलें लक्ष केंद्रित न करतां, किंवा औचित्यानौचित्याची फारशी तमा न बाळगतां केवळ बाह्य गोष्टींवरच भर दिला व रसभावापेक्षा वाच्यवाचकांच्या चारुत्वावरच त्यांनी आपली शक्ति खर्च केली.

आनंदवर्धनासमोर कालिदासानंतरचे भट्टि, भारवी व माघ हे कवि, व रत्नाकर आणि शिवस्वामी हे विद्यमान कवि, यांचीं महाकाव्यें होतीं. त्यांपैकी भट्टीचें 'रावणवध' (भट्टिकाव्य) हें काव्य तर व्याख्यागम्यच होतें. "हें व्याख्यागम्य काव्य लिहून भट्टीने पंडितांना आनंद दिला व अल्पबुद्धि बिचारे हतप्रभ केले", असा या काव्यासंबंधी प्रवाद आहे[७].

यावरूनच भट्टीच्या काळांत कवित्वाला व रसिकतेला कसें अनिष्ट वळण लागलें होतें व रसिकतेवर पाण्डित्याचा पगडा कसा बसत चालला होता हें दिसून येतें. वर आनंदवर्धनाने जे उतारे दिले आहेत त्यांतील तिसरा उतारा अशा प्रकारच्या काव्यांना व त्या काव्यामागील प्रवृत्तींना उद्देशून नसेलच असें म्हणवत नाही.

भारवीचें 'किरातार्जुनीय' हें काव्य अत्यंत ओजस्वी आहे. ओजस्वी शैलीचा प्रवर्तक म्हणून भारवी संस्कृत साहित्यांत अमर झाला. पण अशा या चांगल्या महाकाव्यांतहि अनौचित्याचे दोन प्रसंग ढळढळीतपणें डोळ्यांत भरतातच. भारवीचा अर्जुन अस्त्रविद्येची प्राप्ति व्हावी म्हणून हिमालयांत जातो व तपश्चर्येला प्रारंभ करतो. त्याच्या मनोबलाची परीक्षा पाहावयास इंद्र अप्सरांना पाठवितो. इंद्राच्या आज्ञेने त्या स्वर्गांतून निघतात. येथे सहावा सर्ग संपतो. पुढील सर्गांत अप्सरा व अर्जुन यांच्या भेटींतील संघर्ष पाहावयास मिळेल असें आपणांस वाटतें. पण तसें कांहींहि होत नाही. अप्सरा स्वर्गांतून निघतात, मग त्यांची जलक्रीडा चालते, सायंकाळ होते; त्यानंतर चंद्रोदय, मधुपान, रतिक्रीडा, प्रभात--आणि मग कोठे आपण कशाकरिता हिमालयावर आलों आहोंत याची त्यांना आठवण होते. महाकाव्य किंवा कादंबरी यांत अशीं वर्णनें प्रसंगोपात्त यावींत, तीं येण्यांत कांहीं बिघडत नाही. पण त्यांनाहि कांही मर्यादा आहे. शिवाय त्या वर्णनांनी मूळ कथा किंवा घटना परिपुष्ट व्हावयास हवी. कालिदासाचीं वर्णनें या दृष्टीने अभ्यासण्याजोगीं आहेत; पण किरातार्जुनीयांत तसें झालें नाही. स्वर्गांतून निघाल्यापासून हिमालयावर उतरीपर्यंत गंधर्वाप्सरसांनी जे हे विलास केले त्यांच्या वर्णनाकरिता भारवीने ७, ८, ९ असे संपूर्ण तीन सर्ग खर्ची घातले आहेत. बरें, या वर्णनाने मूळ कथा किंवा निदान ती घटना तरी परिपुष्ट होते असें म्हणावें तर तेंहि नाही. हे तीन सर्ग मुळांतून काढून टाकले तरी तेवढ्याने काव्याला कोठेहि बाध येत नाही. या तीन सर्गांत आलेलीं विविध वर्णनें आपापल्यापरीं घेतलीं तर अतिसुंदर आहेत. त्यावरून कवीचें वर्णनकौशल्य दिसतें; पण कथानकाच्या बांधणीत त्यांची मुळीच गरज नाही.[८] अशा

६. महाकवीनामपि उत्तमदेवताविषयप्रसिद्धसंभोगशृंगारनिबंधनाद्यनौचित्यं शक्तितिरस्कृतत्वात् ग्राम्यत्वेन न प्रतिभासते । (३।४ वरील वृत्ति)

७. व्याख्यागम्यमिदं काव्यमुत्सवः सुधियामयम् ।
हता दुर्मेधसो ह्यस्मिन् विद्वत्प्रियतया मया ॥

८. मज्जनपुष्पावचयनसंध्याचंद्रोदयादिवाक्यमिह ।
सरसमपि नातिबहुलं प्रकृतरसानन्वितं रचयेत् ॥
भट्ट लोल्लटाचें हें वचन अशा प्रकारच्या वर्णनांना उद्देशून आहे हें स्पष्ट दिसतें.

प्रकारच्या विभावानुभावांच्या अनौचित्याला उद्देशून आनंदवर्धन म्हणतो, "अशा प्रकारच्या बाबतींत महाकवींच्या हातूनसुद्धा अनेकदा अविचार झालेला दिसून येतो. महाकवींचा असला, तरीहि तो दोषच होय."[९] पंधराव्या सर्गांत भारवीनें चित्रयुद्धाचें वर्णन केलें,त्यांत त्याने शब्दचित्रांतील ( शब्दबंध इत्यादिकांचें ) नैपुण्य दाखविलें आहे. पण त्यामुळे रासिकांचा विरसच होतो. संपूर्ण काव्यांत भारवीची जी प्रतिभा विलास करतांना दिसते तिच्या मानाने हे दोष अल्प भासतात हें खरें असलें तरी तेवढ्यामुळे ते दोष नाहीत असें होत नाही.

माघ कवीच्या 'शिशुपालवध' या काव्यापासून महाकाव्यरचनेंत एक अनिष्ट प्रवृत्ति निर्माण झाली. महाकवित्वाबद्दलची स्पर्धा ही ती प्रवृत्ति होय. मागील महाकवीच्या काव्यापेक्षा आपलें महाकाव्य सरस (अर्थात् त्यांच्या दृष्टीने ) ठरावें म्हणून कवी एकमेकांवर ताण करूं लागले. माघाचा प्रयत्न अशा प्रकारच्या स्पर्धेतून निर्माण झाला. भारवीवर सर्वच बाबतींत ताण करावी म्हणून माघाने आपलें शिशुपालवध लिहिलें व रसिकमन्य तत्कालीन पंडितांनी माघाला त्याबद्दल प्रशस्तिपत्रहि दिलें. माघाने भारवीवर ताण केली हें खरें; पण ती कोणत्या गोष्टींत? कवित्वांत खास नव्हे! भारवीची प्रतिभा माघांत नाही; भारवीच्या पात्रांची धार माघाच्या पात्रांत नाही, माघाचीं पात्रें ठोकळेबाज आहेत आणि भारवीचें संभाषणकौशल्य तर माघांत नाहीच नाही. या कोणत्याहि बाबतींत माघ भारवीच्या खालोखालहि येऊं शकत नाही. मग मांघाने भारवीवर कोणत्या बाबतींत ताण केली? पाण्डित्य, शास्त्रज्ञान, चित्रकाव्य, वर्णनांची लांबी, अलंकारांची खैरात आणि शब्दपाण्डित्य या व अशा इतर बाबतींत माघाने भारवीला जिंकलें. माघाच्या या प्रभावापुढे भारवि फिका पडला. "भारवि म्हणजे माघांतील रवि," असें पंडित म्हणूं लागले.[१०] पांडित्याच्या या झंझावातासमोर कालिदास तर बिचारा कोठल्या कोठे उडून गेला. त्याच्या काव्यांना पंडित "लघुत्रयी" म्हणून संबोधूं लागले.

माघाने साहित्यांत आणलेली ही स्पर्धावृत्ति तेथेच थांबली नाही; ती पुढे तशीच चालत राहिली. माघानंतर रत्नाकर नांवाच्या काश्मिरी कवीने 'हरविजय' या नांवाचें पन्नास सर्गांचें महाकाव्य लिहिलें व रत्नाकराचाच समकालीन शिवस्वामी याने 'कपिफणाभ्युदय' या नांवाचें आणखी एक महाकाव्य लिहिलें. रत्नाकराची इच्छा माघावर ताण करण्याची होती, तर या दोघांनाहि मागे टाकावें असा प्रयत्न शिवस्वामीचा होता. भारवि व माघ यांची तुलना केली म्हणजे भारवीच्या दोषांचाच माघाने कसा विस्तार केला हें दिसतें. माघ, रत्नाकर व शिवस्वामी यांच्या काव्यांची तुलना करणेंहि असेंच बोधप्रद आहे. या तुलनेवरून असें दिसेल की, कवित्वाला अनावश्यकच नव्हेत, तर निश्चितपणें बाधक ठरणाऱ्या गोष्टींवरच उत्तरोत्तर भर देण्यांत येत होता. रत्नाकर आणि शिवस्वामी यांच्या काळीं चित्रकाव्याला मोठा भर आला होता; संदानितिक–विशेषक–कलापक–कुलक इत्यादींना महत्त्व आलें होतें; कल्पनेवर कल्पना, कोड्या, लांबच लांब पण तेवढींच अनावश्यक वर्णनें, अलंकारांचें अवास्तव स्तोम, शास्त्रज्ञानप्रदर्शन, शब्दपांडित्य व भाषापांडित्य, आणि अखेर म्हणजे श्लेषाचा पदोपदीं उपयोग आणि

९. यत्तु एवंविधे विषये महाकवीनामपि असमीक्ष्यकारिता लक्ष्ये दृश्यते, स दोष एव ।
( ३।१४ वरील वृत्ति )

१०. तावद् भा भारवेर्भाति यावन्माघस्य नोदयः ।
उदिते तु पुनर्माघे भारवेर्भा रवेरिव ॥

जीं पद्यें संस्कृत व प्राकृत अशा दोन्हीहि भाषांनीं वाटूं शकतील अशा पद्यांचे सर्गेचे सर्ग, या सर्व गोष्टींना फार मोठा बाजारभाव आला होता; व हें भांडवल ज्याच्याजवळ भरपूर असेल त्यालाच महाकवित्वाचा मान मिळावा असा जणू संकेत ठरल्यासारखा होता.

रत्नाकर आणि शिवस्वामी हे दोघेहि कवि काश्मीरच्या अवन्तिवर्मा राजाचे सभापंडित होते आणि आनंदवर्धनहि त्याच राजाच्या आश्रयाने राहत होता.[११] आनंदवर्धनासमोर अशा प्रकारें एका बाजूला कालिदास, सर्वसेन, प्रवरसेन, अमरु यांच्या कृतींसारखीं रसपूर्ण काव्यें होतीं, तर दुसऱ्या बाजूला माघाची परंपरा चालविणाऱ्या रत्नाकर व शिवस्वामी या समकालीनांचीं नीरस व सदोष काव्यें होतीं. काव्याच्या नांवाखाली सरस्वतीच्या प्रांगणांत चाललेला हा पांडित्यपूर्ण धुडगूस तो प्रत्यहीं पाहत होता व हा सर्व प्रकार पाहून त्याला अत्यंत विषाद होत होता. काव्याला लागलेलें हें अनिष्ट वळण थांबवावें व काव्याला पुनः रसाभिमुख करावें म्हणून त्याने जो महान् प्रयत्न केला त्याचें परिणत फळ म्हणजे प्रसिद्ध ' ध्वन्यालोक ' होय.

ध्वन्यालोकाच्या वेळची ही परिस्थिति केवळ कर्त्यांपुरतीच मर्यादित नव्हती. ती रसिकांच्या क्षेत्रांतहि शिरली होती. आनंदवर्धनाने ध्वनीवर आक्षेप घेणाऱ्या एका समकालीन अनामिक साहित्यमीमांसकाचें (अभिनवगुप्ताने त्याचें ' मनोरथ ' असें नांव दिलें आहे) म्हणणें दिलें आहे तें असें—" ज्यामध्ये मनाला आल्हाद देणारे असे अलंकार नाहीत, ज्यामध्ये शब्दरचनेची व्युत्पन्नता (शब्दालंकार) नाहीत, जें वक्रोक्तिशून्य आहे, अशा अलंकारशून्य रचनेला ध्वनियुक्त काव्य असें संबोधून त्याची प्रशंसा करणाऱ्या या मूर्खाला ध्वनीचें स्वरूप विचारलें तर तो ध्वनीचें स्वरूप कसें सांगेल कोणास माहीत ? "[१२] अलंकार, व्युत्पत्ति आणि वक्रोक्ति हेंच काव्याचें सर्वस्व आहे अशीच त्या वेळीं रसिकवर्गांत व साहित्यमीमांसकांतहि समजूत होती असें यावरून दिसून येईल. भामहादिकांचे ग्रंथसुद्धा याच दृष्टीने लावण्यांत येत असत. त्यांचा खरोखरी रसाशीं संबंध आहे ही गोष्ट त्या वेळचे अभ्यासक लक्षांत घेत नसत. म्हणूनच आनंदवर्धनाला वक्रोक्ति, रीति आणि वृत्ति या गोष्टींनासुद्धा रसभावपरतंत्रता आहे, व ही गोष्ट लक्षांत घेऊनच पूर्वाचार्यांनी त्यांचें विवेचन केलें आहे ही गोष्ट मुद्दाम पटवून द्यावी लागली.[१३]

---

११. मुक्ताकणः शिवस्वामी कविरानन्दवर्धनः ।
प्रथां रत्नाकरश्चागात् साम्राज्येऽवन्तिवर्मणः ॥ ( राजतरंगिणी )

१२. यस्मिन्नस्ति न वस्तु किंचन मनः प्रह्लादिसालंकृति
व्युत्पन्नै रचितं च नैव वचनैः वक्रोक्तिशून्यं च यत् ।
काव्यं तत् ध्वनिना समन्वितमिति प्रीत्या प्रशंसज्जडो
नो विद्मोऽभिदधाति किं सुमतिना पृष्टः स्वरूपं ध्वनेः ॥
( १।१ वरील वृत्ति )

हा श्लोक आनंदवर्धनाच्या समकालीन असलेल्या मनोरथकवीचा आहे असें अभिनवगुप्त म्हणतो.

१३. ३।३६ च्या वृत्तींत आनंदवर्धनाने ' सैषा सर्वत्र वक्रोक्तिः ' ही भामहाची प्रसिद्ध कारिका देऊन तींमधील अभिप्राय रसपर किंवा व्यंग्यपरच कसा आहे हें सुचविलें आहे. अभिनवगुप्ताने विभाव्यते=विभावतां नीयते, रसमयी क्रियते असा अर्थच दिला आहे. याशिवाय " शब्दविशेषाणां च अन्यत्र चारुत्वं यद्विभागेनोपदर्शितं तदपि तेषां व्यंजक-

अशा या पार्श्वभूमीच्या संदर्भांतून ध्वन्यालोकाचा अभ्यास केला म्हणजे त्याचें स्वारस्य आणि त्यांतील विवेचनाचें महत्त्व अधिकाधिक नजरेंत भरावयास लागतें, व आनंदवर्धनानें कोणतें अनन्यसाधारण कार्य केलें हें लक्षांत येतें. साहित्याच्या स्वकालीन परिस्थितीला लागू होतील असे अनेक निर्देश त्या ग्रंथांत आलेले दिसून येतात. ते सर्व निर्देश येथे देण्याचें कारण नाही. चित्रकाव्यासंबंधीचा एकच निर्देश येथे उदाहरण म्हणून पुरे होईल. चित्रकाव्याबद्दल आनंदवर्धन म्हणतो—

" ज्या काव्यांत व्यंग्यार्थाला प्राधान्य असतें तें काव्य ध्वनिकाव्य होय आणि ज्या काव्यांत व्यंग्यार्थ गौण आहे तें गुणीभूत व्यंग्य काव्य होय; पण या दोन प्रकारांहून वेगळें रसभावविहीन, व्यंग्यार्थाचें प्रकाशन करावयास अगदीच असमर्थ, व केवळ वाच्यवाचकांच्या[1] म्हणजे शब्दार्थांच्या वैचित्र्यावरच आधारलेलें, असेंहि काव्य निर्मिलेलें दिसून येतें. तें केवळ आलेख्यप्रख्य म्हणजे निर्जीव चित्रासारखें असतें, म्हणून त्याला चित्रकाव्य असें म्हणतात. वस्तुतः तें काव्यच नव्हे; काव्याची केवळ ती नक्कल आहे. अशा काव्यांत दुष्कर असे यमकादि शब्दवैचित्र्य प्रकार व व्यंग्यसंस्पर्शरहित व रसभावशून्य असे उत्प्रेक्षादि अलंकार येतात.

" चित्रकाव्य हा कोणता प्रकार आहे ? असें आक्षेपक आम्हांला विचारतील. वरील विवेचनावर ते पुढीलप्रमाणे आक्षेप घेतील. जेथे व्यंग्यार्थाचा संस्पर्श नाही अशा काव्यालाच तुम्ही चित्रकाव्य म्हणतां ना ? पण असें काव्य शक्यच नाही. वस्तु व अलंकार या दोन ध्वनिप्रकारांशिवाय काव्य सापडूंहि शकेल. पण ज्याचा रसभावांशीं संबंध नाही असा काव्य-प्रकारच संभवत नाही. विश्वांत अशी एकहि वस्तु नाही की जिचा संबंध रसभावांशीं विभाव-त्वानेसुद्धा येत नाही. रस हे चित्तवृत्तिविशेष आहेत आणि जी चित्तवृत्तिविशेषाला उत्पन्न करीत नाही अशी विश्वांत वस्तूच नाही.

" ( यावर आनंदवर्धन म्हणतो ) अगदी खरें आहे. जेथे रसभावांची प्रतीति येत नाही असा काव्यप्रकारच संभवत नाही. असें असलें तरी रसभावांची अपेक्षा न ठेवतांच अनेक कवि शब्दालंकार व अर्थालंकारांचें निबंधन करतांना दिसून येतात ना ? तेव्हा त्यांच्या अपेक्षेने तरी त्यांच्या त्या काव्यांत रसभावादिशून्यता मानावी लागेलच ना ? अखेर काव्यां-तील शब्दांचे अर्थ कवीच्या विवक्षेप्रमाणेच घ्यावयाचे असतात. आता कवीने रसादिकांची विवक्षा ठेवली नसतांहि, रसिकाला कदाचित् अशा काव्यांत रसप्रतीति होते असें तुम्ही मानाल, पण ती प्रतीति इतकी दुर्बल असेल की असें काव्य नीरस आहे असेंच मानावें लागेल. मग अशा काव्याची व्यवस्था लावण्यास तरी ' चित्रकाव्य ' हा प्रकार मानावा लागेलच ना ?

" ( पण अशा लिखाणाला काव्य मानावेंच कां ? असें जर कोणी यावर म्हणेल तर त्यावर आमचें उत्तर असें—) आपल्या वाणीला लगाम घालावयास जे मुळीच तयार नाहीत अशा कवींची रसभावादींची पर्वा न ठेवतां काव्य करण्याची प्रवृत्ति आम्हांला दिसून आली आहे. म्हणूनच आम्हांलासुद्धा चित्रकाव्याची कल्पना करावी लागत आहे. नवीनांच्या ( आम्हां ध्वनिवाद्यांच्या ) दृष्टीने तर, ध्वनिव्यतिरिक्त असा काव्यप्रकारच असूं शकत नाही. परिपाकवान् कवींचा काव्यव्यापार रसादितात्पर्याशिवाय शोभतच नाही व विश्वामध्ये अशी एकहि वस्तु नाही की, जी महाकवीच्या काव्यांत रसाचें अंगभूत होत नाही; व अशी ती

त्वेनैव अवस्थितम् इत्यवगन्तव्यम् " असेंही आनंदवर्धन म्हणतो ( ३।१६ वरील वृत्ति ). येथे अन्यत्र = भामहविवरणे असा अभिनवगुप्ताने अर्थ दिला आहे. रीति व वृत्ति यासंबंधांत ३।४६,४७ या कारिका पाहाव्यात.

अनुक्रमणिका

अंगभूत झाली असतां ती सौंदर्यातिशयाला पुष्ट करीत नाही. महाकवींच्या काव्यांत तर हें दिसून येतेंच, पण आम्हीहि आमच्या (विषमबाणलीला, अर्जुन-चरित इत्यादि) काव्यांत उचितरूपाने दाखविण्याचा प्रयत्न केला आहे."[१४]

आनंदवर्धनाचा टीकाकार प्रसिद्ध साहित्यमीमांसक अभिनवगुप्त हा मुद्दा आपल्या लोचन नामक टीकेंत वरील विवेचनाबद्दल म्हणतो—"आनंदवर्धनांनी चित्रकाव्याचें हें जें विवेचन केलें आहे त्यांत चित्रकाव्य हें अकाव्य आहे हेंच सांगावयाचें असून अशा काव्याचा त्याग करावा हें सांगण्याकरिताच येथे त्याचा निर्देश केला आहे. अमुक एक गोष्ट वर्णावी व ती त्याज्य आहे असें शेवटीं सांगावें हा उपदेशाचा नवीनच प्रकार दिसतो असें कोणी यावर म्हणेल तर त्यावर आमचें म्हणणें असें की, कवींनी असें काव्य निर्माण केलें आहे व तें काव्य म्हणून मिरवत आहे. म्हणूनच तें त्याज्य आहे हें सांगण्याकरिता ग्रंथकाराला हा उपदेशाचा खटाटोप करावा लागत आहे."[१५]

आनदवर्धनाने हें सर्व समकालीन प्रवृत्तींना उद्देशून लिहिलें आहे असें म्हणतां येणार नाही काय ? ● ● ●

१४. ३।४२ वरील वृत्ति.

१५. अकाव्यरूपं हि तत् इति कथितम् । हेयतया तदुपदिश्यते इति चेत्—घटे कृते कविर्न भवति इत्येतदपि वक्तव्यम् इत्याशंक्य कविभिः खलु तत् कृतम् इति हेयतया उपदिश्यते —लोचन.

( पान ८ वरून पुढे चालू )

कालनिर्देश आहे[१६]. व तोच त्या व पूर्वीच्या ओळींतहि दिला आहे. त्या ओळींचें वाचन डॉ. कृष्णांनी पुढीलप्रमाणें केलें आहे–'लिखितं चेदं राज्यकरवरिसे षोडशे भाद्रपदे कार्तिकस्य बहुलपञ्चम्यां' असें केलें आहे तेंहि बरोबर नाही. शुद्ध वाचन 'लिखितश्चेदं राज्यसंवत्सरे पञ्चदशे भाद्रपदे कार्त्तिकस्य बहुलपञ्चम्यां' असें दिसतें व तें भांडारकर प्राच्यविद्या मंदिराच्या ॲनल्स-मधील व भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकांतील माझ्या लेखांत दिलें होतें. त्याकडे श्री. खरे व डॉ. तुळपुळे यांचें लक्ष गेलेलें दिसत नाही. ॲनल्समधील लेख प्रसिद्ध झाल्यावर मद्रास येथे हिस्टरी कॉंग्रेसच्या अधिवेशनप्रसंगीं, १९४४ सालीं, माझी डॉ. कृष्णांशीं गाठ पडली होती. त्या वेळीं आपणांस त्या ताम्रपटाच्या लिपीच्या वाचनाचा पुरेसा सराव नसल्याने आपल्या वाचनांत पुष्कळ चुका राहून गेल्या हें त्यांनी प्रांजलपणें कबूल केलें होतें. सारांश, कोल्हापूर-ताम्रपटाच्या लेखाच्या शेवटीं पंडराद्रिशेन असा शब्द नाही. तेव्हा त्यावरून पंढर-पूरच्या प्राचीनत्वाबद्दल अनुमान करणें योग्य होणार नाही. दान दिलेल्या गावाचें पाण्डरङ्गपल्ली हें नांव मात्र स्पष्ट आहे. पण तें सध्याच्या पंढरपुराचेंच नांव होतें की काय याबद्दल संशय आहे. डॉ. कृष्ण यांनी त्या ताम्रपटांतील गावें पंढरपुराजवळ सापडतात असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. कांही गावांचीं नांवें मी निराळीं वाचतों व त्यांचा शोध करून तीं इतरत्र सापडतात असेंहि मीं दाखविलें आहे; पण त्यांची चर्चा येथे करण्याची आवश्यकता नाही. ● ● ●

१६. यांतील संवत्सरसंख्या चिह्नांनी दर्शविली आहे. अशा चिह्नांचें वाचन करणें कठीण असतें.

# साहित्य-समीक्षा

## आई आहे शेतांत

काऱ्या डोंगराने केलेल्या राई या कोकणांतील खेड्यांत घडलेली ही प्रदीर्घ कथा आहे. गावांतील एक सुपीक शेत–साखरपट्टी हा या कथेचा केंद्रबिंदु आहे. साखरपट्टीच्या परिसरांत जीवन फुलतें आणि कोमेजतें, केव्हा माणुसकीचा गहिवर ऐकूं येतो तर केव्हा स्वार्थ आणि वासनांचें तांडव दृष्टीस पडतें, कधी निसर्ग आणि मानव यांचा प्रीति-संगम होतो तर कधी माणसाला परिस्थितीशीं भयंकर झुंज खेळूनहि निराशेचा तडाखा सहन करावा लागतो, कधी ग्रामीण जीवनांतील जोष मनाला स्तिमित करतो तर केव्हा उद्ध्वस्त होत जाणाऱ्या समाजरचनेच्या दर्शनाने मनाला औदासीन्याची काजळी येते. या कथेंतील व्यक्ति राईच्या मातीने घडवल्या आहेत, सर्व भावना-विकारांना पहिल्या पावसाने भिजलेल्या साखर-पट्टीचा सुगंध येत आहे; आणि अनेक समरप्रसंगांमुळे दुवे बदलूनहि, अत्रुटित राहिलेली जीवनाची साखळी अंजनटाके, भारंगमाथा, वारंगकडा या काऱ्या डोंगराच्या सुळक्यांभोवतीं गुंफली आहे.

चारशे पानांच्या या दीर्घ कादंबरींत नानू सातपुतेने आपल्या शैशवापासूनच्या आठ-वर्षींतून राईमधील जीवनाचें चित्र रेखाटलें आहे. परंतु आत्मकथनाच्या पद्धतीचा अवलंब केलेला असूनहि ही कादंबरी निवेदनात्मकच राहिली आहे. नानूच्या दृष्टिकोनांतून प्रत्येक व्यक्तीचें अगर घटनेचें दर्शन घडविण्याऐवजी श्री. दिघे यांनी त्यांचें वस्तुनिष्ठ चित्रण केलें आहे. आधुनिक कादंबरीच्या तंत्रांत दृष्टिकोनात्मक कथनाला फार महत्त्व आहे याची श्री. दिघे यांनी फारशी दखल घेतलेली नाही. हा दोष निर्माण होण्याचें कारण असें की, नानूची व्यक्तिरेखा सुस्पष्टपणें चित्रित करणें व इतर घटनांच्या आधारें त्या व्यक्तिचित्रणाला उठाव देणें हा श्री. दिघे यांचा हेतूच नाही. राईमध्ये राहणाऱ्या अनेक व्यक्तींच्या आयुष्याचे प्रवाह दाखविणें, सामाजिक बदलांतून कुटुंब-जीवन व समाज व्यवस्था कशी उन्मळून पडत आहे हें दिग्दर्शित करणें व परिस्थितीच्या आघातांतूनहि टिकून राहणाऱ्या माणुसकीच्या अंकुरांचें दर्शन घडविणें हे तीन उद्देश श्री. दिघे यांनी कादंबरी लिहितांना डोळ्यासमोर ठेवलेले असावेत.

निसर्गांतील रूप-रस-गंध-ध्वनि व स्पर्श यांच्या बहारीच्या वर्णनांतून श्री. दिघे यांनी वातावरणनिर्मिति साधली आहे. परंतु निसर्ग हा या कथेंत केवळ पार्श्वभूमि म्हणून आलेला नसून, कथानकांतील महत्त्वाचें पात्र म्हणूनच वावरत आहे. शेतीच्या सर्व अवस्थांचीं अगदी बारकाव्याने वर्णनें केलेलीं आहेत. नानू सातपुते हा जमीन कसावयास लागल्यानंतर त्याला शेतकीच्या जीवनांत पंचमहाभूतांशीं अक्षय चाललेल्या समराचा जो प्रत्यय येतो त्याचें प्रभावी चित्रण श्री. दिघे यांनी केलें आहे. माणसें, निसर्ग आणि परिस्थितीचीं स्थित्यंतरें यांचा गोफ

आई आहे शेतांत– [ले. र. वा. दिघे; प्रका.–लेखनवाचनभांडार, पुणें २; किं. ८ रु.]

श्री. दिघे यांनी विणलेला आहे. या दृष्टीने 'सराई' अगर 'पाणकळा' यापेक्षा ही कादंबरी वेगळी आहे. विशेषतः महाराष्ट्रांत कूळकायदा व इतर जमीनविषयक कायदे यांमुळे खेड्यांतील शेतकरी व जमीन-मालक यांचे संबंध कसे दुरावत आहेत, अकारण झगडे कसे निर्माण होत आहेत व त्यामुळे समाजव्यवस्थेंत कसा विस्कळीतपणा येत आहे हें श्री. दिघे यांनी दाखविलेलें आहे. त्यांचा या कायद्यांना विरोध नाही. परंतु वाढलेल्या आकांक्षा व अपुरें सामर्थ्य यांमुळे शेतकऱ्याच्या जीवनाची कशी ससेहोलपट होत आहे व त्यामुळे भूमातेची कशी उपेक्षा चालली आहे हें पाहून त्यांना उद्वेग येतो व नव्या रचनेंत माणुसकी दुर्मीळ होत चालली आहे म्हणून ते हळहळ व्यक्त करतात. ही परिस्थिति सुधारण्यासाठी नानू विज्ञानाचा अवलंब करतो. 'पाणकळां'तील वैज्ञानिक दृष्टीचा उपदेश करणाऱ्या आनंदरावाचे, शास्त्रीय प्रयोग शेतींत करणारा नानू हें विकसित स्वरूप आहे. जिजा, तातू आणि दादाजी यांच्या स्वभावलेखनांत श्री. दिघे अतिशय यशस्वी झालेले आहेत. "वाटुला, वाटुला केला समदा" म्हणून आकस्ताळेपणा करणारी जिजा, खास बडोद्याच्या कायस्थांचें जिव्हालौल्य असलेले तातू व राईला कुटुंब मानणारे गेल्या पिढींतील जीवनाचे प्रतिनिधि दादाजी या व्यक्तिरेखा अतिशय सुस्पष्ट व सुंदर झाल्या आहेत. त्या मानाने नानूचें व्यक्तिदर्शन फिकें वाटतें. सगुणेची कहाणी कोणालाहि चटका लावील अशी आहे. कथानकाच्या अनुरोधाने अनेक व्यक्ति आलेल्या आहेत. त्यांपैकी धोंडूमामा, बंधूजी यांप्रमाणे कांही केवळ प्रातिनिधिक नमुने आहेत; त्याचप्रमाणे झांझ्यासारखी प्रातिनिधिक व वैयक्तिक छटांचें बेमालूम संमिश्रण साधलेली सुंदर व्यक्तिरेखाहि आहे.

नानूला अंजनेबद्दल वाटणारें आकर्षण, भावना-विकारांचे कल्लोळ, परिस्थितीची उलथापालथ, दुरावणारीं अंतःकरणें आणि एकत्र आणणारें तारुण्य यांतून निर्माण केलेलें कथानक वाचकाची उत्कंठा सतत जागृत ठेवते. कादंबरीच्या पूर्वार्धांत असें रेखीव कथानक नाही म्हणून समरप्रसंगांची साखळी जोडून श्री. दिघे यांनी उत्सुकता कायम टिकविली आहे. कादंबरींतील एक मोठा दोष म्हणजे श्री. दिघे आपले विचार केव्हा केव्हा अत्यंत कलाशून्य रीतीने मांडतात. कथानकाच्या ओघांत ज्या कल्पना व्यक्त झाल्या आहेत त्यांचें अधिक स्पष्टीकरण करण्यासाठी, 'सीलिंग जननावर घातलें पाहिजे', 'टेक्निकलर फिल्ममध्ये ते तसले रंग घेतां येणार नाहीत' अशीं वाक्यें जेव्हा श्री. दिघे लिहितात तेव्हा वाचकाचा रसभंग होतो. 'पाणकळां'तील हा दोष 'सराई'त लुप्त झाला होता तो येथे पुन्हा दिसतो. आत्मकथनात्मक कादंबरींत अशा तऱ्हेने लेखकाचें अस्तित्व जाणवणें रसपरिपोषास फारच विघातक असतें. या दीर्घ कादंबरींत कांही भाग जरा कंटाळवाणा झालेला आहे; परंतु वास्तव जीवनाचा संपूर्ण चित्रपट निर्माण करतांना कांही वेळा येणारा कंटाळवाणेपणा टाळणें कठीण आहे. किंबहुना भावनोत्कट प्रसंग एका पाठोपाठ येऊं लागले तर त्यांची परिणामकारकताहि कमी होते. या उत्कट क्षणांच्या भव्यतेस उठाव येण्याच्या दृष्टीनेहि सामान्य क्षणांचें अतिशय महत्त्व असतें. शेतांतील आईच्या दर्शनाने अनुभवलेल्या उत्कट कलानंदाचा स्मृतिसुगंध रसिकांच्या मनांत सतत दरवळत राहील. ● ● ●

ग. प्र. प्रधान.

अनुक्रमणिका

## दासोपंतांची पासोडी

" येणें प्रोत ( क्त ) प्रकारें करूनी । तत्वाची केली मांडणी ।
ते कपाटाकृती नयनीं । व्यक्ति दिसे ।। " पासोडी, ओवी २८३.

दासोपंत हा एक अतिप्रचंड प्रमाणावर ग्रंथरचना करणारा, परंतु तितकाच उपेक्षित असा कवि आहे. सव्वालाख ओव्यांचा ' गीतार्णव ' आणि सव्वालाखांचा ' पदार्णव ' हे दासोपंतांच्या कीर्तिमंदिराचे मुख्य आधारस्तंभ असून त्यांची ' पासोडी ' म्हणजे या मंदिरावर फडकणारी ध्वजाच होय असें म्हटलें तरी चालेल. परंतु दुःखाची गोष्ट अशी की, या महाकवीची आजवर उपेक्षाच होत गेली, आणि या ना त्या कारणाने त्यांचे ग्रंथ उजेडांत येऊं शकले नाहीत. गीतार्णवांतील जेमतेम तीन-साडेतीन अध्याय, पदार्णवापैकीं सुमारें दीड हजार पदें, छोटेखानी स्वरूपाचा ' ग्रंथराज,' उपनिषदांवरील संस्कृत भाष्यांपैकी ईश. केन आणि कठ हीं तीन भाष्यें, व त्यांच्या ' देवघरां 'तील कांहीं कागदपत्रें एवढेंच दासोपंतांचें साहित्य आजपर्यंत प्रकाशित झालें आहे. मध्यंतरीं कांही आस्थेवाईक मंडळींनी भगवद्गीता, तिच्यावरील सुमारें २० मराठी टीकांसहित छापून काढण्याचा घाट घातला; परंतु या विसांत दासोपंतांचा प्रचंड गीतार्णव असल्याने ही योजना गीतेचा पहिला अध्याय प्रसिद्ध होऊन बारगळली. सारांश, एखादा हिमपर्वत (Ice-berg) ज्याप्रमाणे समुद्राच्या पृष्ठभागावर अल्पमात्र दिसून त्याचा फार मोठा भाग समुद्राच्या पोटांत दडलेला असावा, त्याप्रमाणे आमच्या दासोपंतांची स्थिति आहे. त्यांचें वाङ्मय ज्ञात थोडें आणि अज्ञातच पुष्कळ आहे. एवंवर्णित महाकवीला त्याची ' पासोडी ' प्रसिद्ध करून कांही अंशाने का होईना अज्ञातवासांतून बाहेर काढण्याचें श्रेय त्याच्याच प्रांतांतील एक मराठीचे प्रेमी व अभिमानी श्री. पोहनेरकर यांनी घेतलें, यासाठी ते अभिनंदनास पात्र आहेत.

' पासोडी 'चें संपादन श्री. पोहनेरकर यांनी मोठ्या पद्धतशीर रीतीने केलेलें दिसतें. हें काम सर्वच प्रकारें कठीण होतें. एकतर, दासोपंतांनी सुमारें चारशे वर्षांपूर्वी लिहिलेलें हें मराठीचें महावस्त्र आज अतिजीर्ण झालें असून त्यास हात लावणेंहि अशक्य होऊन बसलें आहे. अशा स्थितींत ही जीर्ण पासोडी आंबे-जोगाईहून दिल्लीस नेऊन, तेथे ती राष्ट्रपतींच्या कृपादृष्टीखाली एकवार घालून तिचा आधुनिक पद्धतीने कायाकल्प करण्यांत श्री. पोहनेरकर यांनी मिळविलेलें यश महाराष्ट्राच्या सध्याच्या पडत्या काळांत तरी अपूर्वच म्हटलें पाहिजे. हे सर्व संस्कार करूनहि ही 'पासोडी' मधूनच मौन धरी. तेव्हा आंबे-जोगाईचे श्री. रामभाऊ कुलकर्णी यांनी मूळ प्रतीवरून नकलून काढलेली दुसरी पासोडी संपादकांच्या मदतीला आली व त्यामुळेच आज या कापड-लेखाचें समग्र दर्शन आपणांस घडूं शकत आहे. कापड-लेख हा शब्द आम्ही येथे बुद्धयाच वापरीत आहों. कारण शिलालेख, ताम्रलेख, इष्टिका-लेख, चर्मलेख, नाणकलेख, भूर्जपत्र-लेख व कागद-लेख असे अनेक लेखनप्रकार आपणांस ठाऊक असले तरी चार फूट रुंद आणि चाळीस फूट लांब अशा एका पासोडीवर लिहिलेला हा प्रदीर्घ कापड-लेख एका

दासोपंतांची पासोडी—[संपादक—न. शे. पोहनेरकर. ( पृष्ठसंख्या : ४७+२+१४५+५+११+५+६=२२१); मराठवाडा साहित्य परिषद्, हैदराबाद. इ. स. ( ? ) मूल्य—कागदी रु. ८, कापडी रु. ९. ]

दृष्टीने अपूर्वच आहे. येथे असा एक प्रश्न पुढे येतो की दासोपंतांनी इतर सर्व साधनें सोडून हें मुलखावेगळें साधन हातीं कां धरलें ? या प्रश्नाचें उत्तर त्यांची पासोडी वरवर चाळून पाहिली असतांहि कळून येईल. आपला वर्ण्य विषय केवळ शब्दांनीच नव्हे तर ' कपाटाकृतीं 'नी स्पष्ट करावा हा कवीचा हेतु व तत्सिद्ध्यर्थ त्याने योजिलेल्या अनेकविध आकृति यांचा समावेश कागद कितीहि मोठा घेतला तरी त्यांत झाला नसता. या कामीं कापडाची योजना झाली हेंच ठीक झालें. कारण पंचीकरण (सं.√ पच्=विस्तार पावणें ) हा या ग्रंथाचा मुख्य विषय असून तो दासोपंतांनी शब्दरूपानें व तसाच चित्ररूपानेहि मांडला आहे. साहजिकच अफाट जग ज्याप्रमाणे एका चौरसचौरस नकाशांत सामावतें त्याप्रमाणे या एका पासोडींत विश्वाचा उद्गम आणि विकास दासोपंतांनी सम्यक्रूपाने दाखविला आहे. पासोडींतील या सर्व आकृति संपादकांनी ग्रंथाच्या अखेरीस दिलेल्या असून त्यांवरून पासोडीच्या योजनेची स्पष्ट कल्पना येऊं शकते. या ग्रंथाचें संपादन करतांना श्री. पोहनेरकर यांनी कोणत्याहि बाबतींत कसूर केलेली दिसत नाही. पासोडीप्रमाणेच तिच्या लेखकासंबंधीहि संशोधन करून कांही नवीन माहिती उजेडांत आणण्याचा त्यांनी प्रामाणिक प्रयत्न केलेला आहे. दासोपंत-चरित्राचीं साधनें त्या मानाने फार नाहीत. महिपती, जयरामसुत आणि गिरीधर हे जुने चरित्रकार दासोपंतांचा व त्यांच्या गीतार्णवाचा उल्लेख मात्र करतात, त्यांचें चरित्र सांगत नाहीत. एकनाथांचा चरित्रकार केशव कवि हा थोडें पुढे जाऊन एकनाथ-दासोपंतांच्या भेटी-प्रतिभेटींचीं वर्णनें करतो. नाही म्हणावयास शके १७१७ मध्ये रचना करणाऱ्या दिनकर कवीने मात्र आपल्या 'भक्तमंजरीं'त दासोपंतांचें चरित्र एका अध्यायांत दिलेलें आढळतें. अर्वाचीन इतिहासकारांपैकी कै. वि. ल. भावे यांनी ' महाराष्ट्र-कवि ' मासिकांत छापलेलें दासोपंतचरित्र व खि. जस्टिन् ॲबट् यांनी या चरित्राची काढलेली इंग्रजी आवृत्ति हीं दोन साधनें या दृष्टीने महत्त्वाचीं आहेत व त्यांचा शक्य तेवढा उपयोग श्री. पोहनेरकर यांनी करूनहि घेतला आहे. ' महाराष्ट्र कवि ' त छापलेलें दासोपंतांचें हें पहिलें ओवीबद्ध आणि विस्तृत चरित्र ' अविश्वसनीय आणि बनावट ' असावें हें कै. पांगारकरांचें मत खोडून काढून श्री. पोहरनेरकरांनी त्यांना या चरित्राच्या बिदरप्रांतीं मिळालेल्या दुसऱ्या प्रतीवरून त्याची विश्वसनीयता सिद्ध केली आहे. हें चरित्र लिहिणारा कोणी हनुमदात्मज असून त्याचाहि पत्ता लावण्याच्या शोधांत ते आहेत. सारांश, इतिहासाचीं साधनें शोधून काढून त्यांचा उपयोग दासोपंतांच्या कामीं करून घेण्यांत संपादकांनी तत्परता दाखविलेली दिसते. दासोपंतांसंबंधी कानावर येणाऱ्या आख्यायिकाहि त्यांनी संग्रहित केल्या आहेत; परंतु डोळसपणें. तसेंच दासोपंतांविषयी आजवरच्या संशोधकांनी रूढ करून ठेवलेल्या कांही कल्पनांचें निराकरणहि श्री. पोहनेरकर यांना करावें लागलें आहे. उदा. ' दासोपंतांच्या उपासनेंतील दत्तमूर्ति अजून आंबेजोगाईस आहेत.' हें कै. पांगारकरांचें विधान वस्तुस्थितीला धरून कसें नाही व सध्या जी दत्तमूर्ति आंबेजोगाईस दिसते तिचा इतिहास निराळा कसा आहे तें त्यांनी सप्रमाण रीतीने दाखवून दिलें आहे. श्री. दत्तात्रेयाच्या उपासकांचे तीन संप्रदाय आहेत. गुरु-संप्रदाय, अवधूत-संप्रदाय आणि आनंद-संप्रदाय. पैकी दासोपंत हे आनंद-संप्रदायाच्या परंपरेंत कसे मोडतात आणि या संप्रदायाने रूढ केलेली दत्तभक्ति या विषयांचाहि सविस्तर विचार त्यांनी केलेला आढळतो. ' पासोडी' स संपादकांनी लिहिलेली सुमारें ५० पृष्ठांची प्रस्तावना ज्ञानाने, भक्तीने व कर्माने खच्चून भरलेली आहे असा प्रत्यय ती वाचतांना पदोपदीं येतो. या प्रस्तावनेंतील ज्ञानकण आम्ही थोडेफार दाखविले. त्यांचा संग्रह करतांना संपादकांनी एखादा-दुसरा अपवाद सोडल्यास आग्रह असा कोठे धरलेला दिसत नाही. ही पासोडी दासोपंतांचीच कशावरून या

आक्षेपकाच्या प्रश्नाला त्यांनी दिलेलें 'ही गोष्ट एकटे दासोपंतच करूं शकतात' हें उत्तर तर्कास धरून आहे असें कोणीच म्हणणार नाही. तसेच आंबेजोगाई येथे देवघरांत असणाऱ्या दासोपंतांच्या इतर हस्ताक्षरांबद्दल शंका असली तरी 'पासोडी'वरील अक्षर हें निःसंशय दासोपंतांचें आहे या त्यांच्या विधानांतील सत्यासत्यहि एक दासोपंतच सांगू शकतील. दासोपंतांस त्यांनी बुद्धिप्रामाण्यवादी कां म्हणावें (पृ. २३) तेंहि आम्हांस कळत नाही. त्यांनी आपल्या अनुभूतीशीं प्रामाणिकता राखली असें एकदा म्हणून लगेच त्यांस बुद्धिप्रामाण्यवादी ठरविणें हें तर्कास सोडून आहे. परंतु अशीं स्थळें अपवादात्मक. एकंदरींत त्यांचें विवेचन साधार, सप्रमाण व सयुक्तिक आहे असेंच कोणीहि म्हणेल. संपादकांचा भक्तियोगहि या प्रस्तावनेंत अनुभवास येतो. विशेषतः दासोपंतांच्या साहित्यसागराचा त्यांनी काठाकाठाने करून दिलेला परिचय लेखकाच्या अंतरंगांत भक्तिप्रेम नसतें तर वठला तसा सरस वठला नसता. दासोपंत मराठवाड्याचे आणि त्यांची 'पासोडी' उजेडांत आणणारे श्री. पोहनेरकर हेहि मराठवाड्याचेच. साहजिकच त्यांना या पासोडींत मराठवाड्यांतील मराठी भाषेची चाहूल लागावी आणि ती त्यांनी अभ्यासकांच्या कानांवर घालावी हें उचितच आहे. मात्र दासोपंतांत एखादा-दुसरा द्राविडी शब्द दिसला किंवा एखाद्या ओळींत कानडी-तेलंगण असे शब्द आले की तेवढ्यावरून त्यांनी कानडी आणि तेलंगी भाषाहि अभ्यासिलेल्या होत्या असें जें अनुमान ते काढतात तें मात्र बरोबर नाही. दासोपंत हा सत्र-रस जरी नसला तरी चतुरस्र कवि आहे यांत शंका नाही. साहजिकच त्यांच्या ग्रंथांतून संगीत आणि चित्रकला यांचे अनेक उल्लेख येतात व ते सर्व संग्रहित करून ग्रंथकाराच्या बुद्धीची चतुरस्रता संपादकांनी स्पष्ट केली आहे. श्री. पोहनेरकर यांची भाषा संतवाणींत मुरलेली असल्याने मोठी घोटीव, घाटदार आणि खास मऱ्हाटी वळणाची झाली आहे. प्रस्तावना वाचूनहि प्रस्तावनाकार कसे असतील याची कल्पना यावी इतकी ती बोलकी आहे. संतांची जुनी मराठी आत्मसात् करीत असतांना कांही ठिकाणीं मात्र श्री. पोहनेरकरांच्या हातून अर्थहीनतेचा दोष घडल्यासारखा वाटतो. 'लिहिण्याच्या भरांत क्वचित् आपण अर्थहीन असें कांही लिहून जातों याची जाणीव त्यांस राहत नाही. उदा०, संतांनी एकात्मतेची भडक-भावना जोपासली' (पृ. १६), 'मराठीची भगवी पताका खांद्यावर घेऊन' (पृ. १६), 'त्यांच्या साहित्यसागराचें ध्रुवदर्शन घेणें' (पृ. १८), इ. स्थळें पाहावीं. कांही शब्दहि त्यांचे विशेष आवडते दिसतात. महान् हा शब्द अलीकडे सर्वांनीच वापरून वापरून झिजविला असल्याने श्री. पोहनेरकरहि जेव्हा तो पुन्हा पुन्हा वापरतात तेव्हा त्याचें माहात्म्य निःसंशय कमी होतें. ठांबेठोक (पृ. २१), जांगजोड (पृ. ४२) हे दोन शब्दहि त्यांचे आवडते दिसतात. असो. 'पासोडी'चें मुद्रण पुष्कळच निर्दोष आहे. क्वचित् 'महाजनो येन गतः स पन्थः' (पन्थाः पृ. २९) असें एखाद-दुसरें अशुद्ध रूप डोळ्यांत भरतें हें खरें; परंतु एकंदरींत 'पासोडी'-सारख्या अनेक दृष्टींनी अवघड अशा या प्रकरणाच्या संपादनाचें काम श्री. पोहनेरकर यांनी उत्तम रीतीने पार पाडलें आहे असाच अभिप्राय सर्वांचा पडेल. एका गोष्टीची उणीव मात्र जाणवते. ती म्हणजे शब्द-सूची व विषय-सूची यांचा अभाव. 'पासोडी'ची विषयानुक्रमणिका श्री. गाडगीळ यांनी तयार केलेली ग्रंथाच्या शेवटीं जोडल्याने वाचकांची थोडी तरी सोय होते; परंतु शब्दसूचीच्या अभावीं मात्र ग्रंथ आंधळा होऊन बसतो. 'पासोडी'नंतर दासोपंतांचे इतरहि ग्रंथ उजेडांत आणण्याच्या उद्योगांत श्री. पोहनेरकर आहेत असें कळतें. तेव्हा यापुढे तरी त्यांनी शब्दसूची व विषयसूची देऊन अभ्यासकांची सोय करावी अशी आमची त्यांस आग्रहाची विनंती आहे.

आज निरनिराळ्या विद्यापीठांतून सुमारें शे-सवाशे प्राध्यापक मराठीचें अध्यापन करीत आहेत. परंतु त्यांपैकी एकाचेंहि लक्ष दासोपंतांकडे न जातां ज्यांचा पेशा वरील मंडळींहून फार निराळा अशा एका गृहस्थाने आपल्या एका थोर पूर्वजाच्या ऋणांतून या प्रकारें उतराई होण्याचा प्रयत्न करावा ही गोष्ट सूचक आहे यांत शंका नाही. असो; आजकाल नित्यनवीं पांघरुणें बाजारांत येत आहेत. परंतु पासोडीची ऊब कांही निराळीच असते, असें जाणते म्हणतात. तेव्हा मराठी भाषेवर तिच्याच मालकीच्या एका जीर्ण परंतु विस्मृत अशा पासोडीची पाखर घालून श्री. पोहनेरकर यांनी महाराष्ट्राची फार मोठी सेवा केली आहे असें आम्हांस वाटतें. ● ● ●

शं. गो. तुळपुळे

## माझी संसारयात्रा

' जीवनाच्या महासागरांतील तरुणांना मार्गदर्शन करणारे दीपस्तंभ ' असें रियासतकार सरदेसाई यांचें वर्णन करून त्यांचा संदेश म्हणून जो दिला आहे तो म्हणजे ' सुखं वा यदि वा दुःखं प्रियं वा यदि वाऽप्रियम् । प्राप्तं प्राप्तमुपासीत हृदयेनापराजितः ' असा आहे. या संदेशानेच आपल्या संसारयात्रेची कहाणी सांगण्याला त्यांनी सुरुवात केली आहे. ही कहाणी त्यांनी आपल्याकडून परिपूर्ण सांगण्याचा यत्न केला आहे; परंतु कित्येक ठिकाणीं तिचा अपुरेपणा, अधुरेपणा जाणवल्यावाचून राहत नाही. या हकीकतींत, सहृदयता, आर्जव, स्पष्टवक्तृत्व, शिस्तप्रियता व मर्यादशीलपणा हे गुण सारखे प्रत्ययाला येत राहतात. एका मोठ्या कुटुंबाचा अग्रणी म्हणून त्यांनी दाखविलेली कर्तव्यतत्परता कोणालाहि कित्त्यादाखल होण्यासारखी आहे.

एक परिणाम मनावर विशेष प्रकारें होतो तो म्हणजे रियासतकारांनी सयाजीरावांसंबंधी जें जें कांही म्हणण्यासारखें आहे तें सर्व आता केवळ आपल्या मनांत न ठेवितां कोणा तरी लायक तरुण माणसाला सांगावें, त्याच्याकडून तें लिहून घ्यावें व फिरून तपासून घ्यावें म्हणजे त्याला अधिकृत व विश्वसनीय स्वरूप येईल. सयाजीरावांचीं इंग्रजी व मराठी चरित्रें झालेलीं आहेत. त्यांत सर्वच बारीक व तपशिलाची तसेंच पूर्वी न सांगतां येण्यासारखी अशी कांही माहिती आलेली नसेल ती सर्व आता एखाद्या चांगल्या निबंधांत किंवा प्रबंधांत एकत्रित देणें अवश्य आहे. रियासतकार त्यांच्यासंबंधाने कशा गुण-ग्रहण-वृत्तीने, हर्षामर्षाचे प्रकार मनांत न आणतां निर्विकारपणें लिहूं शकतात हें या पुस्तकावरून दिसून आलेंच आहे. सयाजीराव गायकवाडांची गणना महाराष्ट्राच्या राजकीय नेत्यांची परिगणना करतांना विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनी टिळक व गोखले यांच्याबरोबर केली होती व चवथ्या माणसाचें नांव त्या यादींत नव्हतें. ही १९१२–१३ सालीं घडलेली घटना लक्षांत घेतली म्हणजे सयाजीरावांची योग्यता केवढी मोठी होती याची कल्पना होईल. तरी सरदेसाईंच्या मदतीने कोणी तरी लायक इसमाने हें काम लवकर करण्याची जरुरी आहे हें पुनः पुनः वाटल्यावाचून राहत नाही.

---

माझी संसारयात्रा—[ लेखक–गोविंद सखाराम सरदेसाई; प्रकाशक– केशव भिकाजी ढवळे, कर्नाटक हाऊस, गिरगाव बाजार, मुंबई २. पृष्ठें २३९, किंमत ६ रुपये. ]

सरदेसाई यांनी आपलें सर्व आयुष्य सद्बुद्धीने व सदाचाराने सत्कारणीं लावलेलें आहे व आता ते एखाद्या तपस्वी मुनीप्रमाणे व समाधानी वृत्तीने कामशेत येथे कालक्रमणा करीत आहेत. सामान्य संसारिकांनाच काय, पण ज्यांना आपण कोणी मोठ्या योग्यतेचे व विशेष गुणांनी संपन्न आहों, बुद्धिमत्तेची विशेष देणगी आपणांला आहे असें वाटत असेल त्यांना देखील सरदेसाई यांच्यापासून सततोद्योग, प्रामाणिकपणा, दुसऱ्यालाच नव्हे तर स्वतःलाहि न फसविणें व शिस्तबद्ध रीतीने वागणें हे गुण घेण्यासारखे आहेत. अंगीं विशेष बुद्धिमत्ता किंवा लायकी असली तरी ती कार्यप्रवण व सुफलदायी होण्याकरिता शिस्त, उद्योग, निर्व्यसनीपणा व सन्मार्ग न सोडण्याचा निश्चय हे गुण अंगीं बाणविणें जरूरच असतें. सरदेसाई यांची संसारयात्रा या दृष्टीने अतिशय उपयुक्त व बोधप्रद आहे. प्रकाशकांनी हें पुस्तक प्रसिद्ध करून मराठी वाचकवर्गाची निःसंशय मोठी सेवा बजाविली आहे. ● ● ●

त्र्यंबक विष्णु पर्वते

## जवाहरलाल : चरित्र आणि चारित्र्य

पंडित जवाहरलाल नेहरू यांच्याबद्दलचें कांही फुटकळ वाङ्मय आणि त्यांच्या आत्म-चरित्राचें श्री. नारायणराव गोरे यांनी केलेलें एक सुरस रूपांतर इतकीच मराठींतील सामग्री माझ्या पाहण्यांत होती. श्री. शिखरे यांच्या जवळजवळ आजतागायत चरित्राचें अवलोकन दीर्घकाल न लावतां करणें त्यामुळेच शक्य झालें; कोणाहि समान स्थितींतील व्यक्तीला शक्य होईल. कै. दादासाहेब मावळणकर यांची प्रस्तुत चरित्राला लिहिलेली मार्मिक व समजदार प्रस्तावना वाचतांना, सौ. अवंतिकाबाई गोखले यांच्या गांधींच्या चरित्राला टिळकांनी लिहिलेल्या प्रस्तावनेची पुनः पुनः आठवण झाली. कारण, ज्याप्रमाणे गांधीजींचें जीवनकार्य पुष्कळसें उर्वरित असतांच गोखलेबाईंनी त्यांचें चरित्र लिहून प्रसिद्ध केलें, त्याप्रमाणेच नेहरूंच्या जीवन-कार्याचींहि अनेक पुष्पितें व फलितें आपल्या पदरीं पडावयाची खूप उमेद असतांनाच, शिखरे यांनी त्यांच्या आतापर्यंतच्या अत्यंत सफल व समृद्ध, तसेंच सापेक्ष चरित्राचें दर्शन मोठ्या आपुलकीने, मेहनतीने व समरसतेने घडविलें आहे. नेहरूंचें या देशांत, साऱ्या दुनियेंत व जन-तेच्या अंतःकरणांत जें स्थान आहे त्यामुळे त्यांच्याविषयी मिळेल तितक्या माहितीविषयी औत्सुक्य सार्वत्रिक आहे; तें स्थान त्यांना कां व कसकसें प्राप्त झालें याबद्दलची जिज्ञासाहि तशीच सार्वत्रिक आहे. ती शमविण्याचें एक उत्कृष्ट साधन शिखरे यांनी मराठी वाचकांना उपलब्ध करून दिलें आहे. मावळणकरांच्या आश्वासनपर शब्दांत हीच गोष्ट सांगावयाची तर "मी निश्चितपणें सांगूं शकतों की, शिखरे यांनी लिहिलेला प्रस्तुतचा चरित्र-ग्रंथ वाचा म्हणजे नेहरूंविषयी माहिती मिळविण्याची तुमची पिपासा पूर्णपणें तृप्त होईल."

'कृतज्ञतेचे उद्गार' हा जो प्रास्ताविक मजकूर लेखकाने ग्रंथाच्या सुरुवातीलाच लिहिलेला आहे त्यांत त्यांनी म्हटलें आहे की, "नेहरू-चरित्राचें सुसंगत व साधार निवेदन

राष्ट्रनायक नेहरू—[ लेखक—श्री. दामोदर नरहर शिखरे; प्रकाशक— मेसर्स जोशी आणि लोखंडे, टिळक रस्ता, पुणें २. पृष्ठें ५९३, किंमत १० रुपये. ]

करण्यावर मीं या ग्रंथांत भर दिलेला आहे. तथापि विशेष घटनांचा कार्यकारणभाव उलगडून दाखवून त्यांचें मूल्यमापन करण्याचा प्रयत्न मीं यथावसर व शक्य त्या निःपक्षपातीपणाने केला आहे." लेखकाची ही प्रतिज्ञा त्याने कसोशीने पाळली आहे असें समग्र ग्रंथ वाचल्यावर पटल्यावाचून राहत नाही. रचनेचें व कथनाचें कौशल्य ग्रंथभर पसरलेलें प्रत्ययाला येतें. त्याचप्रमाणे ज्या चार चिंतनिका ग्रंथामध्ये लेखकाने लिहिल्या आहेत, त्यांमुळे वाचकाला इकडे तिकडे पाहूं देऊन त्याचें चित्त भरकटणार नाही अशी काळजी घेऊन, नेहरूगडावर चढणाऱ्या नवशिक्या मुशाफराला सरळ व सुरक्षित वाट दाखविण्याची कामगिरी दक्षतेने बजाविली आहे. शेवटची चिंतनिका या दृष्टीने मोठी बहारदार वठली आहे. नेहरूंचें शब्दचित्र या चिंतनिकेंत मोठें ठसठशीत व एखाद्या चिताऱ्यालाहि नवी स्फूर्ति देईल असें वठलें आहे.

शिखरे यांच्या नेहरू-चरित्राचें हिंदी, गुजराती, बंगाली वगैरे भाषांत भाषांतर करण्याची तजवीज प्रकाशक करतील तर चांगलें होईल. हिंदी करतांनाच उर्दूचीहि व्यवस्था व्हावी. याच भाषांचा उल्लेख करण्याचें कारण तें काम सोपें आहे. या भाषांचे संप्रदाय, वाक्प्रचार, म्हणी वगैरेहि भाषांतरांच्या फारशा आड येणार नाहीत. दाक्षिणात्य भाषांसंबधाने मी बोलूं शकत नाही. इंग्रजी करणें झाल्यास पुष्कळसा संक्षेप चालून जाईल. ● ● ●

त्र्यंबक विष्णु पर्वते

## पुन्हा नभाच्या लाल कडा

मराठवाडा साहित्य परिषद् प्रकाशनाने, परभणीचे कवि बी. रघुनाथ उर्फ कै. बी. आर्. कुलकर्णी ह्यांच्या कवितांचा संग्रह 'पुन्हा नभाच्या लाल कडा' ह्या नांवाने प्रसिद्ध केला आहे. कवींच्या अकाली मृत्यूनंतर दोन वर्षांतच त्यांच्या कविता एकत्र करून हा संग्रह प्रकाशित करण्यांत आला आहे.

१९३० सालापासून सुरवातीला 'फुलारी' ह्या नांवाखाली त्यांचं लिखाण प्रसिद्ध होऊं लागलें. त्यानंतरच्या काळांत कवितेबरोबरच लघुकथा, कादंबऱ्या, लघुनिबंध इ० वाङ्मय-प्रकारहि त्यांच्याकडून हाताळले गेले व जवळ जवळ १३।१४ पुस्तकें त्यांच्या नांवावर आज प्रसिद्ध आहेत.

कवितेखाली लेखनकाल दिलेले नसले तरी सुरवातीला छापलेल्या त्यांच्याच एका पत्रावरून १९४९ नंतरच्या काळांत त्यांच्या काव्यलेखनाला विशेष बहर नव्याने आला असावा, असें वाटतें. ह्या काळांतील त्यांच्या कविताच ह्या संग्रहांत बहुधा अधिक असाव्यात!

ह्या संग्रहाविषयी एकदम बरें किंवा वाईट कोणतेंच मत देतां येऊं नये, असें कांहीसें वेगळेंच स्वरूप त्यांच्या कवितेचें आहे. त्यांच्या कांही कविता—त्यांतील कांही कल्पना-चित्रांमुळे आणि भावोत्कटतेमुळे—अतिशय प्रभावी उतरल्या आहेत. तरीपण कांहीतरी नवीन प्रत्यय आल्याचें जें समाधान चांगली कविता नेहमीं देत असते, तसें संपूर्ण समाधान ह्या संग्रहाच्या वाचनांतून वाचकांना मिळत नाही. पण त्याचबरोबर हेंहि खरें आहे की, ज्या कविता प्रायः समकालीन कवींच्या चांगल्या कवितांचा मनसोक्त आस्वाद

पुन्हा नभाच्या लाल कडा–[बी रघुनाथ; मराठवाडा साहित्य परिषद् प्रकाशन, पृष्ठें ६+१३८+२१. मूल्य ३ रुपये.]

घेतांना त्यांना स्फुरल्या आहेत, ( आणि कांही कवितांबाबत त्यांनी तशी प्रांजळ कबुलीहि सुरवातीच्या पत्रांत दिली आहे ) त्यांचीहि जात सामान्यपणें केवळ अनुकरणात्मक असणाऱ्या कवितांहून वेगळी आहे. तेव्हां एक विचित्र अशी सरभेसळ ह्या संग्रहांत जाणवते.

ह्याचें एक कारण असें असावें की, बऱ्यापैकी कवित्वशक्ति असूनहि स्वतःचें खरें रूप न्याहाळण्याची, शोधण्याची जी जाणीव कांही वेळा कवीला आवश्यक असते ( कांही कवींपाशीं ती उपजतच असते ) तिचा तितकासा विकास बी. रघुनाथांच्या ठिकाणीं झालेला आढळून येत नाही. विविध अनुभूतींना आपण शब्दरूप दिलें पाहिजे ह्या जाणीवेच्या-पलिकडे ते अजून फारसे गेलेले आढळत नाहींत. सुरवातीच्या पत्रांत तेच आपल्या स्नेह्यांना लिहितात :

" आतापर्यंत झालें त्यांत विविधता आहे. ' हुडहुडी ' सारख्या अनुभूतीला शब्द-रूप दिलें आहे; तसें उदात्त भावांचें आवाहनहि केलेलें आहे. ' दुपार ' सोडली नाही तशी ' मध्यरात्रहि '. त्यांत ' धूर ' आहे आणि ' धूळ 'हि, ' ज्वार ' आहे आणि ' ज्वाला 'हि आहेत. ' पुरनारी ' आहेत, ' पथनारी ' देखील ! घर आहे. पथ आहे आणि रस्त्यांतलीं दृश्येंहि आहेत." ( हीं कवितांचीं शीर्षकें आहेत.)

ह्यावरून मी काय म्हणतों, त्याची कल्पना येईल. अधिक स्पष्ट व्हावें म्हणून एक उदाहरण घेऊं : ' ज्वार ' ह्या कवितेंतील कांही ओळी पहा :

सजणी
ज्वार आणिली ज्वार
....पाखड यांतिल खडे भराभर
निवड सार निःसार
वरणें घालुनि मुखि जात्याच्या
ओव्या म्हण गे, चार
स्वर्णसिद्ध निजकरिं घरकरिणी
काढ पीठ कसदार इ०...

ही कविता ' विनोदी ' नाही हें लक्षांत घेतलें की ह्यांतील अनुभवाला किंवा त्याच्या अभिव्यक्तीला आपण कौटुंबिक प्रेमाचा आविष्कार म्हणूं काय, हा प्रश्न निर्माण होतो. आणि ना. वा. टिळक ह्यांच्या " कुणास्तव कुणीतरी " ह्या कवितेशीं तुलना करण्याचा मोह आपणांस नकळत होतो.

ह्या संग्रहांत कांही कविता कुसुमाग्रज-कान्त-पोवळे ह्यांच्याप्रमाणें थोडयाफार ' स्थंडिल' संप्रदायांत जमा होणाऱ्या आहेत तर कांही कवितांतून तांबे-कांत-बोरकर ह्यांच्या पद्धतीचीं गहिरीं शृंगार-चित्रें आणि प्रेम-चित्रें रेखाटलेलीं आढळतात.

पडले झेलित खड्ग बळींचें
राजपथीं अभिमन्यु आजचे
त्या मरणाच्या कथा घरोघर असाच उठविति जाळ !

इत्यादि ओळींतून अग्नि-संप्रदायाची ग्वाही पटेल. विशेषतः कांतांच्या कवितेचें आकर्षण त्यांना अधिक असावें. ' कलि दूतांनो ' ह्या कवितेंत कांतांच्याच पद्धतीने ते म्हणतातः

दग्ध उरांच्या धूप धगीचे
भोग भाग नव नरमांसाचे
करुनि फेडिले नवस जयांचे

करपल्या आंतड्याचा याहि
फुलवरा तयांना करा करा.
तोडित नीरस चर्म तान्हुलें
विवस्त्र सांगाड्यावर थिजलें
भरवस्तीमधि गृध्र विहरले
ताळबंद साख्यांत नासवुन
चारला घुशींना मोतिचुरा....

' रे ओल्या काष्ठा ' ' अन्नदेवा ' ' धुराड ' इ. आणखीहि अशा तऱ्हेच्या कांही कविता आहेत.

त्यांच्या शृंगारगीतांतील शैलीवर देखील कांतांच्या शैलीची दाट छाया कधी कधी आढळते. मागे त्यांनी एकदा कांतांच्या शैलीविषयी लिहितांना राजहंसाच्या चाऱ्यासारखे वेचक, अर्थवाही, अनुप्रासगर्भ आणि नादमय शब्द त्यांत आढळतात असें म्हटलें होतें. त्यामुळेच त्यांना त्यांच्या शैलीचा मोह पडला असावा.

पण सुरवातीलाच म्हटल्याप्रमाणे त्यांची कविता ह्यामुळे सामान्य अनुकरणात्मक कवितेसारखी मात्र कुठेहि झालेली नाही, हें अवश्य लक्षांत घेतलें पाहिजे. त्यांची स्वतंत्र कल्पनाशक्ति त्यामुळे कुठेहि खुरटलेली वाटत नाही.

' रंगाऱ्याचें गाणें ' ' नेस नवी साडी ' ' दर्पणा ! ' ' तें न तिनें कधि ओळखलें ' ' नगरभवानी ' ' सांज ' ' पुन्हा नभाच्या लाल कडा ' ' हे आकाश ' ' ये मनांत ' ' ती तुमच्यावर हंसली रे ' ' एक असा क्षण ' ' कुठें कसें ग, पडलें कुंडल ! ' इ. कविता विशेष लक्षांत राहण्यासारख्या आहेत ! ● ● ●

रमेश तेंडुलकर

## पांच संगीतिका

' शितू ' ' पडघवली ' इ. कादंबऱ्यांचे आणि ' राधामाई ' ह्या नाटकाचे लेखक श्री. गोपाळ नीळकंठ दांडेकर ह्यांच्या पांच संगीतिकांचा संग्रह प्रसिद्ध झाला आहे. ह्या संग्रहांत यशोधरा, परिव्रज्या, गंगातीरी, हर्जीक अशा चार संगीतिका आणि वंजारीगीत हें लहानसें संगीतक आहे.

संगीतिकेमध्ये नाट्याचें तंत्र सांभाळून शिवाय संगीताचा परिणामहि शेवटपर्यंत कायम ठेवावा लागतो—त्यामुळे त्यांतील संवादाची योजना अधिक अवघड असते ! गोपाळ नीळकण्ठ दाण्डेकर ह्या बाबतींत बरेचसे यशस्वी ठरले आहेत, असें म्हटलें पाहिजे. केशवराव भोळ्यांनी प्रस्तावनेंत म्हटलें आहे की, ' दांडेकरांची रचना सोपी, सुबोध व रसाळ असल्याने श्रोत्यांच्या मनावर ऐकता ऐकताच कसलाहि ताण न पडता परिणाम होतो.' एका विख्यात संगीत–दिग्दर्शकांचे हे उद्गार असल्यामुळे ह्या संगीतिकांच्या प्रायोगिक यशाबद्दल आणखी कांही विचार करण्याची आवश्यकता मला वाटत नाही.

तसेंच त्यांच्या भाषाशैलीविषयी ! विशेषतः त्यांच्या कादंबऱ्या वाचणारांनी ह्या भाषेचें विशेष कौतुक केलें पाहिजे. त्यांच्या कादंबऱ्यांमधून ज्या अतिरंजित, नाटकी भाषा-

पांच संगीतिका—[ गोपाळ नीळकण्ठ दाण्डेकर—व्हीनस प्रकाशन पुणें २. पृष्ठें : १२+६६ मूल्य १।। रुपया. ]

शैलीचा विशिष्ट परिणामासाठी ते अवलंब करतात, (विशेषतः 'शितू' कादंबरींत हें जाणवत!) त्यापासून बऱ्याच प्रमाणांत त्यांच्या ह्या संगीतिका अलिप्त आहेत. उलट त्यांतील लालित्य आणि एक प्रकारचा बाळबोधपणा ह्या कथानकांस परिपोषकच ठरला आहे.

मात्र ह्याबरोबर दुसरीहि गोष्ट जाणवते. 'यशोधरा' 'गंगातीरीं' ह्यासारख्या संगीतिकांमध्ये 'पुढे काय घडणार आहे' त्याची आधीच आणीव वाचकांना असते आणि अशाहि परिस्थितींत वाचकांचें कुतूहल कायम ठेवील असा भाग ह्या संगीतिकांत फारच थोडा आहे. 'हर्जीक' मध्ये देखील

कोंबड्याची सा ऽ द मला ऐकूं आली
आभाळाची सोभा ऽ लाल लाल झाली

अशा थोड्याश्या चांगल्या वर्णनांखेरीज नावीन्य कांहीच नाही. अभिनयामुळे आणि उत्कृष्ट संगीत रचनेमुळे ह्यांचे प्रयोग कदाचित् अतिशय यशस्वी होत असतील; पण वाचतांना मात्र कंटाळा यावा, इतका निव्वळ धोपटपणा त्यांच्या शैलींत आहे. वेगवेगळ्या पातळ्यांवरून ती संवाद लेखन करूं शकत नाही....आणि ती शैली संपन्न अशी मुळींच वाटत नाही.

'वंजारी गीत' हें लहानसें संगीतक मात्र अतिशय प्रभावी उतरलें आहे. 'हुम्बा हो रे....हुम्बा हो रे' ह्या घुमणाऱ्या शब्दांतूनच त्या जमातीच्या रानटीपणाचा, शूरपणाचा आणि धर्मश्रद्धांचा चित्तथरारक अनुभव आपणांस येतो; ह्या शब्दांची साथ शेवटपर्यंत हा परिणाम कायम ठेवण्यास मदत करते. अनेक कारणांमुळे हें त्यांचें संगीतक अतिशय प्रभावी ठरतें! ● ● ●

रमेश तेंडुलकर

जगन्नाथ महाजन

# वामन पंडिताचा भागवतधर्म

शिवकालीन कवि वामन पंडित हा वारकरी नाही, आणि तरीहि तो स्वतःला भागवत-धर्मीय म्हणवून घेतो. विष्णूच्या आणि त्याच्या अवतारांच्या, त्यांतल्या त्यांत श्रीकृष्णाच्या भक्तीचा तो आग्रहाने पुरस्कार करतो. विष्णूखेरीज इतर देवतांना कुणीं नमन केलें तर त्यांचा तो कडक शब्दांत निषेध करतो. त्याचा हा भागवतधर्म कोणता, हें समजावून घेण्याचा प्रस्तुत प्रयत्न केला आहे.

अद्वैतमताचा स्वीकार करण्यापूर्वी वामन माध्वमतानुयायी ( द्वैती ) होता. त्या काळांत माध्वांच्या परंपरेला अनुसरून त्याने श्रीमद्भागवतपुराणाचें नैष्ठिक पठन केलें होतें. त्या काळांतच त्याचें कृष्णावर मन जडलें होतें. पुढे भार्गवी वारुणी विद्या प्राप्त झाल्यावर त्याने अद्वैतमताचा स्वीकार केला. पण सगुणभक्ति सोडली नाही. कृष्णाला त्याच्या हृदयांत मिळा-लेलें स्थान अढळ राहिलें. त्याने पुढे काव्यलेखन केलें. त्या लेखनांत त्याने ज्या ज्ञानोत्तर अद्वैत-भक्तीचा पुरस्कार केला ती सगुणभक्ति होती. त्याने सांगितलें :

यास म्हणावें भागवत धर्म । की ज्ञानें श्रवणकीर्तन सगुणाचें ।— यथार्थदीपिका

त्याच्या ह्या भूमिकेमध्ये तडजोड आहे. माध्वमताची अद्वैताशीं सांगड घालण्याचा पांडित्यपूर्ण प्रयत्न आहे. माध्वांच्या सगुण सावळ्या श्रीकृष्णाशीं एकरूप झालेलें वामनाचें मन तिथून ढळूं शकलेलें नाही. पण बुद्धीनें मात्र अद्वैतमताचा स्वीकार केला आहे. ह्यांतूनच अपरिहार्यपणें ज्ञानोत्तर सगुणाद्वैत भक्तीच्या तत्त्वज्ञानाचा जन्म झाला आहे. आचार्य मंडळींच्या रीतीला अनुसरून, आपलें हें तत्त्वज्ञान गीतेवर आधारलेलें आहे असें सिद्ध करून, त्या तत्त्व-ज्ञानाला मान्यता प्राप्त करून देण्याकरिता त्याने यथार्थदीपिका लिहिली आहे. ती लिहिताना त्याला भगवद्गीतेकडे श्रीमद्भागवताच्या उपनेत्रांतून पहावें लागलें आहे. श्रीमद्भागवताचा सगुणपर अर्थ लावण्याची संथा त्याने पूर्वीच माध्वांकडून घेतली असल्याने शुक, सनक, नारद वगैरे भागवती भक्तांची भक्ति ही ज्ञानोत्तर सगुणभक्ति आहे असें प्रतिपादन करणें त्याला जड गेलेलें नाही.

यथार्थदीपिकेमध्ये आणि इतर तत्त्वज्ञानपर ग्रंथांमध्ये वामनाने भक्तीचें महत्त्व नैष्कर्म्याहूनहि अधिक मानलें आहे. पण सगुणभक्ति ही निर्गुणभक्तीप्रत जाण्याची एक पायरी आहे ही गोष्ट त्याने कुठेहि मान्य केलेली नाही. कारण त्याच्या मनांत माध्वांचा भक्तिमार्ग रुजलेला आहे. तो उखडून न टाकता त्याला अद्वैताकडे जावयाचें आहे. जातिवंत मीमांसका-प्रमाणे त्याने ह्या दोन भूमिकांची सांगड विलक्षण चातुर्याने घातली आहे. एका आचरण-धर्माचें विवेचन करावयाचें असूनहि त्याची भिस्त अनुभव आणि साक्षात्कार ह्यापेक्षा अध्ययन आणि व्यासंग ह्यावर जास्त आहे. म्हणूनच त्याच्या तत्त्वज्ञानपर वाङ्मयामध्ये बुद्धिमत्तेची चमक दिसत असूनहि तें रुक्ष व तत्त्वजड झालें आहे.

वामनाने भक्तीचें हें नवें तत्त्वज्ञान मांडलें. पण तें व्यवहारांत उतरविण्याकरिता म्हणून एखाद्या विशिष्ट वैष्णव मंदिरांतील मूर्तीची आराधना सुरू केली नाही. त्याऐवजी त्याने आपलें मन पौराणिक आख्यानें लिहिण्यामध्ये गुंतविलें. त्याने हीं आख्यानें मुख्यतः श्रीमद्भागवतांतील कृष्णकथांवर आणि त्यांतल्या त्यांत बाळकृष्णाच्या कथांवर लिहिलीं आहेत. मृत्तिकाभक्षणाचा, उखळबंधाचा किंवा असाच एखादा लहानसा कृष्णचरित्रपर प्रसंग घेऊन तो जिव्हाळयाने

अनुक्रमणिका

रंगविण्यांत त्याचें सारें पांडित्य पणाला लागलें आहे. तत्त्वज्ञानपर कवितेमध्ये रूक्ष वाटणारा बुद्धिवादी वामन इथे भावनेने थबथबून बोलत आहे. त्याच्या हृदयांतली सगुणसावळ्या कृष्णाची भक्ति इथे अत्यंत हळुवार व संवेदनाक्षम बनली आहे. अनुभूतीच्या जिव्हाळ्याने प्रत्येक ओळ रसरसून आली आहे. अनुप्रासांच्या तालांशीं स्वभावोक्तीचा मेळ आपोआप जमला आहे. त्यासाठी त्याला वेगळी धडपड करावी लागलेली नाही. कृष्णाच्या लोकोत्तरत्वा-विषयींच्या पूज्यभावांतून हें सारें घडलें आहे. त्यांत कुठें पांडित्यजडता आलेली नाही. ती येणेंहि शक्य नाही. कारण केवळ पांडित्याचा डामडौल मिरविण्याकरितां ही आख्यानें निर्माण झालेलीं नाहीत.

ह्या आख्यानांमागे हरिनाम-संकीर्तनाची एक प्रबल इच्छा आहे. हरिगुणगोडी अंतरंगीं ठसावी म्हणून केलेला एक प्रामाणिक प्रयत्न आहे. ‘ हरिकथा ’ ह्या शब्दाचा अर्थच मुळीं इथें हरिगुणनुगान असा आहे. मंगला-चरणांत नमन हरीला आणि समारोपांत वंदनहि हरीलाच ! पहिल्या श्लोकांत हरीच्या कथेचें सूत्र सांगितलें जातें आणि नामसंकीर्तनाच्या गजरांत त्याचा विस्तार होतो. त्याच्या स्तुतिस्तोत्रांची आवर्तनांमागून आवर्तनें होतात. बांधेसूद संविधानक निर्माण करण्याच्या दृष्टीनें कवि संपूर्ण बेफिकीर रहातो.

मुक्त–मयूरांच्या तुलतेने कथाकवि म्हणून वामन फिका पडतो असें सांगितलें जातें. पण वामन हा आधी तत्त्वज्ञ आहे आणि मागाहून कवि ( रूढ अर्थानें ) आहे. दोन भिन्न तत्त्वज्ञानांची सांगड घालून का होईना पण त्यानें स्वतःचें असें एक तत्त्वज्ञान निर्माण केलें आहे. आणि त्या तत्त्वज्ञानाचें यथार्थत्व इतरांना पटवून देण्याकरितां म्हणून त्याने तत्त्वज्ञानपर ग्रंथ लिहिले आहेत. पण इतकें करून त्याला समाधान लाभलेलें नाही. आत्मशुद्धीचा त्याला सारखा ध्यास लागलेला आहे. त्या ध्यासांतूनच ही आख्यानें निर्माण झालीं आहेत. कथाकाव्य निर्माण करण्याच्या भावनेंतून त्यांचा जन्म झालेला नाही. म्हणूनच त्याच्या ह्या काव्यांमध्ये वरवर दिसणाऱ्या वस्तुनिष्ठेपाठी, आत्मनिष्ठा सतत उभी आहे.

वामनानें कृष्णभक्तीचें एक नवें तत्त्वज्ञान दिलें. पण मठ स्थापन करून आणि चार शिष्य जमवून स्वतःचा असा संप्रदाय सुरू केला नाही. कारण तें त्याच्या स्वभावांतच नव्हतें. स्वतःला वामनशिष्य म्हणवून घेणारी, बापू वामन, हरि वामन, साम्राज्य वामन वगैरे अनेक मंडळी आपण होऊन वामनी काव्याच्या भोंवती येऊन उभी राहिली. वामनी काव्यरचनेंतील गुणांचें त्यांनी तंतोतंत अनुकरण केलें. पण त्या अनुकरणांत वामनाची प्रखर तत्त्वनिष्ठा आली नाही. केवळ हेतुशून्य कारागिरी आली. आणि वामनाचा भागवतधर्म हा त्याच्यापुरताच मर्यादित राहिला. ● ● ●

# पत्रव्यवहार

### नरीन्द्र आणि प्रा. डोळके

स. न. वि. वि.

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या एप्रिल–मे–जून १९५६ च्या अंकांत प्रा. सुरेश डोळके यांचा नरींद्रांचा प्रतिभाविलास हा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत रुक्मिणीपत्रिकेसंबंधाने त्यांनी जें लिहिलें आहे त्याचा सारांश असा :—

( १ ) आपण आपली कथा भागवत व पद्मपुराण यांतून घेतली आहे असें नरींद्र वारंवार सांगतो पण त्या मूळ ग्रंथांत तर पत्रिकेचा पत्ता नाही. रुक्मिणीने कृष्णाकडे ब्राह्मणाबरोबर तोंडीं निरोप पाठविला एवढेंच त्यांत आहे. लिखित-पत्रिका पाठविल्याचा निर्देशहि त्यांत नाही. हरिवंश, विष्णुपुराण इत्यादि ज्या संस्कृत ग्रंथांत रुक्मिणीविवाहाचा उल्लेख आला आहे त्यांतहि कोठे लिखितपत्रिकेचा निर्देश नाही. मराठींत रुक्मिणी-स्वयंवराचें गायन प्रथम ( नरींद्रापूर्वी ) महदंबेने केलें आहे त्यांतहि लिखिताचा उल्लेख नाही; अर्थात् रुक्मिणी-पत्रिका हा नरींद्राचाच प्रतिभाविलास होय. " केवळ तोंडीं निरोपापेक्षा ' लिखितां ' त भावनेचा आविष्कार अधिक सुंदर होतो........हें जाणूनच नरींद्रासारख्या भावसंकुल व कलाचतुर कवीने रुक्मिणीचें भावलिखित निर्माण केलें असावें. "

( २ ) प्रा. डोळके पुढे म्हणतात, " नरींद्रानंतर रुक्मिणी-स्वयंवरावर काव्य-रचना करणाऱ्या एकनाथ, सामराज, विठ्ठल इत्यादि कवींनी आपल्या काव्यांत ' श्रीमद्भागवता ' चा आपण आधार घेतला असें म्हणत म्हणत ' रुक्मिणीपत्रिके ' चा उल्लेख केला आहे. रुक्मिणी-स्वयंवर लिहितांना ' मूळ सांडून सर्वथा । नाही वाढविलें ग्रंथा ' असें म्हणणाऱ्या एकनाथांनीहि ' कृष्णप्राप्तीचा सद्भावो । यालागीं तो सुदेवो । कृष्णप्राप्तीसी धाडिला पहा हो । निज पत्रिका देवोनी ' असा पत्रिकेचा निर्देश केला आहे. ' जे बोलली भागवतीं पुराणीं । विस्तारिली जे पुरुषीं पुराणीं ' असें म्हणणारा सामराजहि ' मुद्रामुद्रित–पत्रिका करुनि ते विप्रापुढें ठेविली ' असा ' मुद्रामुदित–पत्रिके ' चा उल्लेख करतो. विठ्ठलानेहि ' वदे भीमकी वासुदेवा सुदेवा । त्वरें जाउनी पत्र दे वासुदेवा ' असा पत्राचा उल्लेख केला आहे. "

येथे नरींद्रानंतरच्या एकनाथादि कवींनी पत्रिकेची कल्पना नरींद्रापासूनच घेतलेली असून त्यांनी या ऋणाचा निर्देश केलेला नाही असें प्रतिपादण्याचा प्रा. डोळके यांचा आशय उघड दिसतो.

वरील दोन्ही गोष्टींच्या मुळाशीं, श्रीमद्भागवतांत रुक्मिणीपत्रिकेस म्हणजे लिखित-पत्रिकेस कांही आधार आहे की नाही हाच मुख्य प्रश्न आहे त्याचाच शोध घेऊं.

श्रीमद्भागवत दशमस्कंध अध्याय ५२ मध्ये ३६ व्या श्लोकानंतर रुक्मिण्युवाच असें म्हणून त्यापुढे ' श्रुत्वा गुणान् भुवनसुंदर शृण्वतां ते ' इत्यादि जे सात श्लोक दिले आहेत ती रुक्मिणीपत्रिका होय अशीच आजवरील सार्वत्रिक समजूत आहे. ती लिखित–पत्रिका होती असेंच सर्व मराठी कवि मानीत आले आहेत. वामनाने या सात श्लोकांचा भावार्थ चौदा श्लोकांत दिला असून त्यांच्या शेवटीं ' लिखित–भाव तिचा बरवा मनें । उकलिला हृदयांतुनि वामनें ' असा लिखिताचा उल्लेख केला आहे. प्रा. डोळकेच काय ते ही लिखित-पत्रिका नव्हती, तो तोंडीं निरोप होता असें म्हणत आहेत. लिखितपत्रिका ही कल्पना नरींद्रापूर्वी नव्हती असें त्यांचें म्हणणें आहे. म्हणून श्रीमद्भागवतांतील येथील टीका काय आहे तें पाहूं.

श्रीमद्भागवतावर तीस–एकतीस टीका झालेल्या असल्या तरी त्यांमध्ये श्रीधराचार्यांची श्रीधरी टीका विशेष प्रसिद्ध आहे. महाराष्ट्रांतले पुराणिक भागवताच्या ज्या पोथ्यांवरून पुराण सांगतात त्यांत ही श्रीधरी टीकाच असते. भागवतटीकाकार श्रीधराचार्य म्हणजे पांडव-प्रतापादि मराठी ग्रंथ रचणारे नाझेरकर श्रीधरकवि नव्हत. टीकाकार श्रीधराचार्य हे बरेच जुने आहेत. त्यांचा काळ निश्चित झालेला नाही. तथापि हेमाद्रीने केलेल्या उल्लेखावरून श्रीधराचार्य हे हेमाद्रीपूर्वी होऊन गेलेले आहेत, असें कै. त्र्यंबक गुरुनाथ काळे यांनी सप्रमाण दाखविलें आहे. हेमाद्रीपूर्वी म्हणजे बाराव्या शतकांत किंवा त्याच्यापूर्वी. हेमाद्रीनंतर बऱ्याच काळाने झालेल्या नरींद्राच्या पुष्कळ पूर्वी श्रीधराचार्य होऊन गेले एवढें तरी निश्चित समजावयास प्रत्यवाय नाही. श्रीधराचार्यांनी भागवताच्या ज्या प्रतीवर टीका लिहिली ती-शिवाय अन्य प्रतीहि तुलनेसाठी त्यांनी घेतल्या होत्या असें त्यांच्या टीकेवरून दिसून येतें. अन्य प्रतींतील पाठांतरें व न्यूनाधिक श्लोकहि निर्दिष्ट केलेले आहेत. प्रस्तुत ' श्रुत्वा गुणान् भुवनसुंदर शृण्वतां ते ' इत्यादि श्लोकांवर टीका करतांना त्यांनी प्रथम एक श्लोक दिला आहे तो असा :—

रुक्मिण्या स्वयमेकान्ते लिखित्वा दत्तपत्रिकाम् ।
मुद्रामुन्मुच्य कृष्णाय प्रेमचिन्हामदर्शयत् ॥

हा श्लोक देऊन पुढे श्रीधराचार्य म्हणतात, " ब्राह्मणः श्रीकृष्णानुज्ञया वाचयति श्रुत्वेति. " रुक्मिणीने एकान्तीं स्वतः पत्रिका लिहून ती मुद्रामुद्रित करून ब्राह्मणाजवळ दिली. ब्राह्मणाने कृष्णाकडे गेल्यावर मुद्रामुन्मुच्य म्हणजे त्या सीलबंद लखोट्यावरील सील काढून आंतली ती प्रेमपत्रिका कृष्णास दाखविली. तेव्हा तुम्हीच वाचून दाखवा असें कृष्णाने सांगि-तल्यावरून ब्राह्मणाने ' श्रुत्वा गुणान् भुवनसुंदर ' इत्यादि ती सप्तश्लोकात्मक रुक्मिणीपत्रिका वाचून दाखविली, असा स्पष्ट उल्लेख येथे केलेला आहे.

वरील 'रुक्मिण्या स्वयमेकान्ते' इत्यादि श्लोक टीकाकार श्रीधराचार्यांनी श्रीमद्भागवताच्या एखाद्या प्रतींतून उद्धृत केलेला असावा असें मला वाटतें. भागवतांतील ' मूळ सोडूनि सर्वथा । नाही वाढविलें ग्रंथा ' असें सांगणाऱ्या एकनाथांनी ज्यापक्षी या श्लोकाधारेंच पत्रिकेचा उल्लेख केला आहे त्यापक्षी एकनाथ हे हा श्लोक श्रीमद्भागवतांतलाच मानीत होते हें सिद्ध होतें. सामराज मुद्रा–मुद्रित पत्रिकेचा उल्लेख करतो तोहि वरील श्लोकाच्या आधारेंच करतो. पत्रिक मुद्रा–मुद्रित होती हें या श्लोकांतील मुद्रामुन्मुच्य या शब्दांवरून स्पष्टच होत असल्याने सामराजाने केलेला तो उल्लेख पूर्ण साधार आहे, निराधार नाही. याप्रमाणे एकनाथादि कवि ' रुक्मिण्या स्वयमेकान्ते ' इत्यादि पूर्वोक्त श्लोक श्रीमद्भागवतांत-लाच मानीत असले तरी तो श्लोक टीकाकार-श्रीधराचार्यकृत असावा अशी शंका कोणी घेणें शक्य आहे. पण तसें मानण्याने नरीन्द्राने लिखितपत्रिकेची कल्पना मूळ भागवताऐवजी त्याच्या श्रीधरी टीकेंतून घेतली एवढाच बदल होईल. त्याने ती कल्पना कोठून तरी घेतली एवढें मान्य केल्यावर, त्या कल्पनेचें जनकत्व त्याच्याकडे राहत नाहीच. अर्थात् लिखित रुक्मिणीपत्रिका हा नरींद्राचा प्रतिभाविलास नव्हे आणि एकनाथादि कवींनी ही पत्रिकेची कल्पना नरींद्रापासून घेतली हेंहि खरें नव्हेच नव्हे. कळावें. ● ● ●

६०२ शिवाजीनगर, पुणें ४.
२५-९-५६

आपला,
य. ग. फफे.

६

# परिषद्-वार्ता

( चिटणिसांकडून )

टिळक-आगरकर-जन्मशताब्दी—कै. लोकमान्य टिळक व कै. प्रि. गोपाळराव आगरकर यांच्या जन्मशताब्दीनिमित्त परिषदेने १३ जुलै ते २२ जुलै या अवधींत निरनिराळ्या सात विद्वानांचीं व्याख्यानें घडवून आणलीं. १३ जुलैला प्राचार्य वि. के. जोग यांनी व्याख्यानमालेचें उद्घाटन केलें. १४ जुलैला डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांचें 'विवेकनिष्ठेचे प्रणेते आगरकर' या विषयावर व्याख्यान झालें. १५ जुलैला झालेल्या व्याख्यानांत डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी लो. टिळकांच्या वैदिक संशोधनाचा परिचय करून दिला. १८ जुलैला प्रा. गं. बा. सरदार यांनी टिळक-आगरकरांच्या कार्याचें समालोचन केलें. २० जुलैला प्रा. वि. स. गोगटे यांनी टिळकभक्तांचीं जीवनमूल्यें विशद करून सांगितलीं. २३ जुलैला सकाळीं १० वाजतां म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या हस्तें लो. टिळकांच्या छायाचित्राचें अनावरण करण्यांत आलें. या प्रसंगीं प्रा. पोतदार यांनी लो. टिळक व संमेलन-परिषद् यांच्यांतील जुने संबंध उकलून दाखविले.

✓स्मृतिदिन—कै. वा. म. जोशी स्मृतिदिनानिमित्त २० जुलैला प्रा. वि. स. गोगटे यांनी कै. वामनरावांच्या कांही आठवणी सांगितल्या व त्यांना श्रद्धांजलि वाहिली. कै. काकासाहेब खाडिलकर यांच्या स्मृतिदिनीं ( २६ ऑगस्ट ) पं. महादेवशास्त्री जोशी यांचें व्याख्यान झालें. याप्रसंगीं श्री. य. ना. आंठवले यांनी काकासाहेबांच्या कांही नाट्यस्मृति सांगितल्या व श्री. ह. वि. वाडेकर यांनी छोटेसें भाषण करून काकासाहेबांची थोरवी वर्णिली.

भेटी—गेल्या तिमाहींत पुढील मान्यवरांनीं परिषदेस भेटी दिल्या—श्री. ग. त्र्यं. माडखोलकर ( ११-८-५६ ) शिक्षणाधिकारी श्री. भांडारकर ( २८-८-५६ ) श्री. पी. टी. नरसिंहाचार्य ( २-९-५६ ) श्री. बाबू वृंदावनलाल वर्मा ( १५-९-५६ ) रा. सा. र. छ. जोशी ( २८-९-५६ ).

वाङ्मयेतिहास—परिषदेच्या वाङ्मयेतिहास योजनेस आर्थिक साहाय्य करावें अशी विनंती करण्यासाठी नागपूर विद्यापीठाचे कुलगुरु न्या. मू. अण्णासाहेब मंगलमूर्ति यांच्या नेतृत्वाखाली परिषदेचें शिष्टमंडळ मध्यप्रदेशाचे मुख्यमंत्रि पं. रविशंकर शुक्ल यांना १७ ऑगस्टला नागपूर येथे भेटलें. शिष्टमंडळांत पुढील मंडळी होती—परिषदेचे अध्यक्ष डॉ. शं. दा. पेंडसे, कार्याध्यक्ष प्रा. चिं. वि. जोशी, प्रि. श्री. ल. पांढरीपांडे, व प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे. शिष्टमंडळाच्या विनंतीचा सहानुभूतिपूर्वक विचार करूं असें आश्वासन मुख्यमंत्र्यांनी दिलें.

अनुक्रमणिका

## साभार स्वीकार

१ "जुना वहर"—ले. प्रका. न. का. घारपुरे व सौ. रमाबाई घारपुरे ८१२ सदाशिव पुणें २; मूल्य २ रु.

२ आगरकरदर्शन—(प्रि. आगरकरांच्या निवडक लेखांचा संग्रह) प्रका—मॉडर्न बुक डेपो, पुणें २; मूल्य ३ रु.

३ भगवान् श्रीकृष्ण—ले. बाळशास्त्री हरदास; ना. शं. दाते, २००।३ सदाशिव पुणें २; मूल्य १० रु.

४ महाभारतावरील प्रवचनें—बाळशास्त्री हरदास; ना. शं. दाते, २००।३ सदाशिव पुणें २; मूल्य १० रु.

५ रामचरित्र—(कवि रघुनाथ रसालकृत) संपा-भा. रा. भालेराव, काशीराम शर्मा, रघुवीरसिंह; राजकमल पब्लि. लि., दिल्ली; मूल्य ३॥ रु.

६ मऱ्हाटी लावणी—म. वा. धोंड, मौज प्रकाशन मुंबई ४; मूल्य ६ रु.

७ पश्चिमेचा वारा—ले. प्रका. श्री. म. माटे, नातबाग, पुणें २; ४॥ रु.

८ टिळक आणि आगरकर—श्री. ना. बनहट्टी; सुविचार प्रकाशन नागपूर १; मूल्य ३॥ रु.

९ चंदनाचा उंबरठा-अच्युत बर्वे, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २, मूल्य ३ रु.

१० लोकसाहित्याची रूपरेखा—[ले. दुर्गा भागवत, प्रकाशक—मुंबई मराठी ग्रंथ-संग्रहालय, भाई जीवनजी लेन, ठाकूरद्वार मुंबई नं. २ किं. १० रु.]

११ भक्ती वा कल्प-वृक्ष—[ले. प्रकाशक भा. पं बहिरट, एम् ए. अध्यक्ष पंढरपूर संशोधन मंडळ महाद्वार—पंढरपूर, मूल्य ३ रु.]

---

## नवीन सभासद

### तहह्यात

१ श्री. भा. ग. महामुनी, मनमाड.
२ मिस्. एच्. एम्. लँबर्ट, लंडन.
३ सौ. लीला भागवत, मुंबई ४.
४ डॉ. वि पां. दांडेकर, बडोदे.
५ श्री. पं. अ. कुलकर्णी, पुणें २.

### साधारण

१ श्री. ज. सी. सोहोनी, पुणें २.
२ सौ. संगुणाबाई काळे, पुणें ४.
३ श्री. ग. रा. कुलकर्णी, पुणें २.
४ श्री शि. म. पुराणिक, सांगली.
५ श्री. श्री. दा. पानवलकर, सांगली.
६ श्री. मा. ना आचार्य, कुर्ला (मुंबई)
७ श्री. वि. वा. भालेराव, पुणें २.
८ श्री. प्रा. ना. पां गुणे सोलापूर.
९ सौ शकुंतला चिंतामणि लाटकर, पुणें २.
१० श्री. मा. कृ. आपटे, पुणें २.
११ कु. नलिनी रघुनाथ आठवले, पुणें २
१२ श्री. श्री. गु. तांबोळकर, पुणें २.
१३ श्री. अ. श्री. सरदेसाई, पुणें २.



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

१. मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभाव अखेर )
 ले-कै. वा. अ भिडे ( प्रती शिल्लक नाहींत )

२. म. सा. परिषद्-इतिहास
 ले. म. म. प्रा. द. वा. पोतदार — मूल्य ३ रु.

३. संत वाङ्मयाची सामाजि फ.ल ति
 ले. प्रा. गं. बा. सरदार .... मूल्य २ रु.

४. वाङ्मयीन समालोचन ( १९४७ ) ... मूल्य २ रु.

५. शुद्धलेखननियम .... मूल्य २ आ.

६. वाङ्मयीन वाद ( परिषद्-पुरस्कृत ) मूल्य ३ रु.

७. प्राचीन पद्यवेंचे ( प्राज्ञ परीक्षेस लावलेले ) .... मूल्य २॥ रु.

८. निबंधविकास ( प्राज्ञ परीक्षेस लावलेलें ) मूल्य २ रु.

९. साहित्यसुगंध ( प्रवेश परीक्षेस लावलेलें ) मूल्य २ रु.

क्र. ७, ८ व ९ हीं पुस्तकें सोडून इतर पुस्तकें सभासदांस सवलतीच्या दराने मिळतील. ( टपालखर्च वेगळा )

मागणीस्थळः—चिटणीस, म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

* * *

## महाराष्ट्र साहित्य परिषद्, पुणें २.

कार्यालयाच्या वेळा :

सकाळीं – ८ ते १० व दुपारीं – ४ ते ८.

दर मंगळवारीं सुट्टी.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र



संपादक

वा. रा. ढवळे

वर्ष ३० : अंक ११७ एप्रिल – मे – जून १९५६

या अंकांत

श्री. पर्वते, श्री. अरविंद मंगरूळकर, श्री. बाळशास्त्री हरदास, श्री. सुरेश डोळके, डॉ. तुळपुळे, यांचें साहित्य, शिवाय संपादकीय, परिषद्वार्ता इत्यादि.

अनुक्रमणिका

